

# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३३०) श्रीविष्णुपादादिकेशांतस्तोत्रम्

लक्ष्मीभर्तुर्भुजाग्रे कृतवसति सितं यस्य रूपं विशालं
नीलाग्रेस्तुङ्गशृंगस्थितमिव रजनीनाथबिम्बं विभाति ।
पायान्नः पाञ्चजन्यः स दितिजकुलत्रासनैः पूरयन् स्वैः
निर्ध्वानैर्नीरदौघध्वनिपरिभवदैरम्बरं कम्बुराजः ।।१।।

भगवान श्रीवैकुंठनाथांच्या आळवणी साठी आचार्य श्री निर्माण केलेल्या विविध स्तोत्रां पैकी हे अत्यंत रमणीय स्तोत्र. त्याच्या नावातच त्याचे स्वरूप स्पष्ट होते. भगवंताच्या चरण कमला पासून केशसंभारा पर्यंत प्रत्येक गोष्टीचे यात वर्णन केले आहे.

भगवंताच्या या दिव्य स्वरुपाचे वर्णन करण्यापूर्वी प्रथम श्लोकात आचार्य श्री त्यांच्या हातातील शंखाचे वर्णन करीत आहेत. त्याची दोन महत्त्वपूर्ण कारणे आहेत.

एक तर लांबून भगवंताच्या जवळ येताना सर्वप्रथम त्यांनी उंच केलेल्या हातातील पांचजन्यच आपल्याला दिसणार आहे. दुसरी गोष्ट भगवंताचे रूप दिसण्यापूर्वी या पांचजन्याचा ध्वनी कानावर येणार आहे.

त्याचे वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

लक्ष्मीभर्तुर्भुजाग्रे कृतवसति - श्री महालक्ष्मीचे पती असणाऱ्या भगवान विष्णूच्या हातात निवास करणारा,

सितं - पांढराशुभ्र असणाऱ्या

यस्य रूपं विशालं - ज्याचे रूप अत्यंत विशाल आहे अशा,

नीलाग्रेस्तुङ्गशृंगस्थितमिव रजनीनाथबिम्बं विभाति - घनश्याम भगवंताच्या हातात पांढराशुभ्र असणारा शंख जणू काही नील पर्वतावर उगवलेल्या पांढर्या शुभ्र चंद्रबिंब प्रमाणे दिसतो.

पायान्नः पाञ्चजन्यः स - तो पांचजन्य आमचे रक्षण करो. दितिजकुलत्रासनैः - दितिचे पुत्र असणारा दैत्यांनी त्रास दिलेल्या

पूरयन् स्वैः

निर्ध्वानैर्नीरदौघध्वनिपरिभवदैरम्बरं - आकाशाला भरून टाकणाऱ्या स्वतःच्या आवाजाने पळवून लावून पराभव करणाऱ्या,

कम्बुराजः - शंखांचा सम्राट पांचजन्य आमचे रक्षण करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**३३१) श्रीविष्णुपादादिकेशांतस्तोत्रम् -२**

आहुर्यस्य स्वरूपं क्षणमुखमखिलं सूरयः कालमेतं
ध्वान्तस्यैकान्तमन्तं यदपि च परमं सर्वधाम्नां च धाम ।
चक्रं तच्चक्रपाणेर्दितिजतनुगलद्रक्तधाराक्तधारं
शश्वन्नो विश्ववन्द्यं वितरतु विपुलं शर्म घर्मांशु शोभम् ।।२।।

भगवान श्री विष्णूंच्या वरच्या दोन हातात शंख आणि चक्र विराजमान असतात. स्वाभाविक सर्वप्रथम शंखाचे वर्णन केल्यानंतर वंदनाचा दुसरा मान आहे सुदर्शन चक्राचा. भगवान वैकुंठनाथांच्या त्या लोकविलक्षण अयुधाचे वर्णन करताना आचार्य श्री म्हणतात,

आहुर्यस्य स्वरूपं क्षणमुखमखिलं सूरयः कालमेतं

- क्षणापासून देवतांच्या काळापर्यंत अर्थात प्रलया पर्यंत संपूर्ण काळ हेच ज्याचे स्वरूप म्हटलेले आहे, अर्थात कालचक्र हेच ज्याचे स्वरूप आहे.

भगवंताच्या हातातील आयुधाचे नाव चक्र आहे. तर काळालाही कालचक्र असे म्हणतात. जणू सर्व काळाला संचालित करण्याची शक्ती म्हणूनच भगवंताच्या हातात सुदर्शन आहे ही आचार्यांची भूमिका अत्यंत रम्य आहे.

अर्थात या सर्व गोष्टींवर भगवंताचे नियंत्रण आहे, हे चक्र भगवंताच्या हातात आहे तोपर्यंत सु-दर्शन असते. एकदा ते भगवंताच्या हातातून सुटले की विश्व विनाशकारी असते. मात्र भगवंताच्या हातात असली तर अज्ञानाचा नाश करते. ते सांगताना आचार्य म्हणतात,

ध्वान्तस्यैकान्तमन्तं - जे सर्व प्रकारच्या अज्ञानरुपी अंधकाराचा विनाश करते.

यदपि च परमं सर्वधाम्नां च धाम - याच स्वरूपात जे सर्व प्रकारच्या तेजांचे तेज आहे. अर्थात ज्याच्यामुळे इतरांना तेज प्राप्त होते.

चक्रं तच्चक्रपाणे: - भगवान चक्रपाणिंच्या हातातील ते चक्र.

दितिजतनुगलद्रक्तधाराक्तधारं - त्यांच्या शरीरातील रक्तांच्या धारांनी या चक्राची धार भिजलेली आहे.

शश्वन्नो विश्ववन्द्यं वितरतु विपुलं शर्म घर्मांशु शोभम् - ते विश्ववंद्य असणारे सुदर्शन चक्र आम्हाला विपुल प्रमाणात शुभ आणि धर्माला शोभून दिसणार्या गोष्टी प्रदान करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३३२) श्रीविष्णुपादादिकेशांतस्तोत्रम् - ३

अव्यान्निर्घातघोरो हरिभुजपवनामर्शनाध्मातमूर्तेः
अस्मान्विस्मेरनेत्रत्रिदशनुतिवचःसाधुकारैः सुतारः ।
सर्वं संहर्तुमिच्छोररिकुलभुवनं स्फारविस्फार नादः
संयत्कल्पान्तसिन्धौ शरसलिलघटावार्मुचः कार्मुकस्य ।।३।।

भगवान वैकुंठनाथांच्या हातातील शंख आणि चक्राचे वर्णन केल्यानंतर त्यांच्या आणखी एका दिव्य अस्त्राची वंदना करताना आचार्य श्री भगवान श्रीविष्णूंच्या शार्ङ् नामक धनुष्याचे वर्णन करीत आहेत.

शृंग म्हणजे शिंगापासून निर्माण केलेले असल्याने या धनुष्याला शार्ङ् असे म्हणतात. याच शब्दाचे अपभ्रंश होत पुढे शारंगधर, सारंगपाणि असे शब्द रूढ झाले.

या धनुष्याचे वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

अव्यान्निर्घातघोरो हरिभुजपवनामर्शनाध्मातमूर्तेः - वाऱ्याच्या वेगाने हलणाऱ्या भगवान श्री विष्णूच्या हातात असणाऱ्या, सर्व प्रकारच्या भीषण संकटांचा विनाश करणाऱ्या,

अस्मान्विस्मेरनेत्रत्रिदशनुतिवचःसाधुकारैः सुतारः - आमचे संकट दूर करणाऱ्या अशा त्याच्या स्वरूपामुळे अर्थात सर्व देवांनी केलेल्या स्तुतीचे साधू उद्गार, दिलेल्या धन्यवादाच्या आरोळ्यांनी ज्याचा सुतार म्हणजे टणत्कार अधिकच गगनभेदी होत आहे.

सर्वं संहर्तुमिच्छोररिकुलभुवनं - दैत्यांच्या संपूर्ण कुळाचाच परिपूर्ण विनाश करण्याची इच्छा असलेल्या,

स्फारविस्फार नादः - त्याच्या टणत्काराच्या नादाने,

संयत्कल्पान्तसिन्धौ - जणूकाही प्रलय ओढवलेला आहे असा भास निर्माण करणारे. शरसलिलघटावार्मुचः - बाणांचा जणुकाही ढग फुटावा असा वर्षाव करणाऱ्या,

कार्मुकस्य - भगवान श्रीहरीच्या धनुष्याचे, वर्णन नेमके करावे तरी कसे?



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३३३) श्री विष्णुपादादिकेशांतस्तोत्र -४

जीमूतश्यामभासा मुहुरपि भगवद्बाहुना मोहयन्ती
युद्धेषूद्धूयमाना झटिति तटिदिवालक्ष्यते यस्य मूर्तिः ।
सोऽसिस्त्रासाकुलाक्षत्रिदशरिपुवपुश्शोणितास्वाददृप्तो
नित्यानन्दाय भूयान्मधुमथनमनोनन्दको नन्दको नः ।।४।।

भगवंताच्या प्रत्येक आयुधाला एक स्वतंत्र आणि सुंदर नाव आहे. पहिल्या श्लोकात पांचजन्य नावाच्या शंखाचे, दुसऱ्या श्लोकात सुदर्शन नावाच्या चक्राचे, तिसऱ्या श्लोकात शार्ङ् नावाच्या धनुष्याचे वर्णन केल्यानंतर इथे भगवंताच्या नंदक नावाच्या खड्ग म्हणजे तलवारीचे वर्णन करीत आहेत.

त्याचे गुण वैभव सांगताना आचार्य श्री म्हणतात,

जीमूतश्यामभासा - जीमूत म्हणजे मेघ. त्याप्रमाणे या तलवारीचा रंग आहे. वास्तविक तलवारीचा रंग चमकदार पांढरा स्वच्छ असतो. पण भगवान स्वतः मेघश्याम असल्याने तलवारीच्या पात्यावर त्यांचे प्रतिबिंब पडल्याने तलवार त्या रंगाची दिसत आहे. आचार्य आणि त्यासाठी भासा असा शब्द वापरला आहे.

मुहुरपि भगवद्बाहुना मोहयन्ती- जी भगवंताच्या हातात अत्यंत शोभून दिसत आहे.

युद्धेषूद्धूयमाना झटिति तटिदिवालक्ष्यते यस्य मूर्तिः - युद्धामध्ये अत्यंत त्वरित गतीने उपसल्यामुळे ती एखाद्या विजेप्रमाणे लखलखत आहे.

सोऽसिस्त्रासाकुलाक्षत्रिदशरिपुवपुश्शोणितास्वाददृप्तो - दैवतांचे शत्रू असणाऱ्या राक्षसांच्या कुळातील वीरांचा आघाताने होणाऱ्या वेदनांमुळे रडणाऱ्या, शरीरातील रक्ताचा स्वाद घेऊन जी तृप्त होते, अशी ती ,

नित्यानन्दाय भूयान्मधुमथनमनोनन्दको नन्दको नः - मधु नावाच्या राक्षसाचा विनाश करणाऱ्या भगवंताला आनंद देणारी तलवार आम्हाला नित्य आनंद प्रदान करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३३४) श्रीविष्णुपादादिकेशांतस्तोत्र -५

कम्राकारा मुरारेः करकमलतलेनानुरागाद्गृहीता
सम्यग्वृत्ता स्थिताग्रे सपदि न सहते दर्शनं या परेषां ।
राजन्ती दैत्यजीवासवमदमुदिता लोहितालेपनार्द्रा
कामं दीप्तांशुकान्ता प्रदिशतु दयितेवाऽस्य कौमोदकी नः ।।५।।

युद्धाच्या वैशिष्ट्यपूर्ण प्रसंगी भगवान हातात तलवार किंवा धनुष्य धारण करतात. त्यामुळे त्याचे वर्णन वर केले आहे.

मात्र भगवंताच्या हातात सदैव असणारे आयुध म्हणजे गदा. या गदेचे नाव आहे कौमोदकी.

मोद म्हणजे आनंद. सगळ्या जगाला राक्षसांच्या त्रासापासून वाचवून आनंद देणारी असल्याने तिला कौमोदकी असे म्हणतात.

तिचे महात्म्य वर्णन करून वंदन करताना आचार्य श्री म्हणतात,

कम्राकारा - अत्यंत सुंदर आकार असलेली, आकर्षक स्वरूप असणारी,

मुरारेःकरकमलतलेनानुरागाद्गृहीता - मुर नावाच्या राक्षसाचा विनाश करणाऱ्या भगवान विष्णूंना मुरारी असे म्हणतात.

अशा भगवान श्रीविष्णूंनी आपल्या करकमलाच्या अग्रभागाने अर्थात बोटांनी, अत्यंत प्रेमाने धारण केलेली,

सम्यग्वृत्ता - सर्व बाजूंनी व्यवस्थित गोल असलेली. समान असणारी.

स्थिताग्रे सपदि न सहते दर्शनं या परेषां - जिला आपल्यासमोर उभ्या असलेल्या शत्रूचे दर्शनही सहन होत नाही. अर्थात शत्रू दिसताच ती त्याचा विनाश करते. कोणताही शत्रू तिच्यासमोर उभा ही राहू शकत नाही अशी.

राजन्ती दैत्यजीवासवमदमुदिता - त्यांच्या शरीरातून वाहणारे रक्त आणि मदाला जिरवणारी,

लोहितालेपनार्द्रा - त्या रक्ताच्या लेपाने ओली दिसणारी.

कामं दीप्तांशुकान्ता प्रदिशतु दयितेवाऽस्य कौमोदकी नः - ती अत्यंत तेजस्वी कौमोदकी नावाची गदा आमच्या मनोकामना पूर्ण करणारी ठरो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**३३५) श्रीविष्णुपादादिकेशांतस्तोत्र -६**

यो विश्वप्राणभूतस्तनुरपि च हरेर्यानकेतुस्वरूपो
यं सञ्चिन्त्यैव सद्यः स्वयमुरगवधूवर्गगर्भाः पतन्ति ।
चञ्चच्चण्डोरुतुण्डत्रुटितफणिवसारक्तपङ्कांकितास्यं
वन्दे छन्दोमयं तं खगपतिममलस्वर्णवर्णं सुपर्णम् ।।६।।

भगवंताच्या आयुधाचे वर्णन केल्यानंतर भगवान विष्णूच्या सोबत स्वाभाविकच याचे अत्यंत सहजरीत्या स्मरण होते त्या भगवंत वाहन असणाऱ्या श्री गरूडांचे वर्णन प्रस्तुत श्लोकात आचार्य श्री नी केलेले आहे. ते म्हणतात,

यो विश्वप्राणभूतस्तनुरपि च हरेर्यानकेतुस्वरूपो - या संपूर्ण विश्वाच्या भगवान विष्णूचा शरीराला देखील धारण करणारा, त्यांच्याही स्वरूपाचा आधार असणारा, त्यांचे यान म्हणजे वाहन आणि केतू म्हणजे ध्वज असणारा.

भगवंताच्या झेंड्यावर देखील गरुडाचे चिन्ह अंकित असते. त्यामुळे भगवंताला गरुडध्वज असे म्हणतात.

यं सञ्चिन्त्यैव सद्यः स्वयमुरगवधूवर्गगर्भाः पतन्ति - ज्याचे केवळ स्मरण केल्याने देखील नाग लोकांच्या वधूंचे गर्भ तत्काळ पतन पावतात. अर्थात त्याच्या स्मरणाने शत्रू जन्मापूर्वीच नष्ट होतात.

चञ्चच्चण्डोरुतुण्डत्रुटितफणिवसारक्तपङ्कांकितास्यं - ज्याची अत्यंत तीक्ष्ण आणि प्रचंड चोच, नाग योध्यांच्या तुटलेल्या मस्तकातील वसा आणि रक्त यांनी माखलेली आहे.

वन्दे छन्दोमयं तं खगपतिममलस्वर्णवर्णं सुपर्णम् -

त्या अत्यंत शुद्ध, सोनेरी रंगाने तळपणाऱ्या शरीराच्या, छंदोमय अर्थात ज्ञानसंपन्न असणाऱ्या सर्व पक्षांचा राजा असणाऱ्या सुपर्ण नामक गरुडाला मी वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

### ३३६) श्री विष्णुपादादिकेशांत स्तोत्र -७

विष्णोर्विश्वेश्वरस्य प्रवरशयनकृत् सर्वलोकैकधर्ता
सोऽनन्तः सर्वभूतः पृथुविमलयशाः सर्ववेदैश्च वेद्यः ।
पाता विश्वस्य शश्वत् सकलसुररिपुध्वंसनः पापहन्ता
सर्वज्ञः सर्वसाक्षी सकलविषभयात् पातु भोगीश्वरो नः ||७||

भगवान श्रीविष्णूंच्या हातातील विविध आयुधांचे वर्णन केल्यानंतर प्रस्तुत श्लोकात भगवान जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज श्रीहरीच्या आसन स्वरूपात विराजमान असणाऱ्या भगवान श्री शेषांचे वर्णन करीत आहेत. ते म्हणतात,

विष्णोर्विश्वेश्वरस्य - सगळ्या विश्वाचे स्वामी असणाऱ्या भगवान श्रीविष्णूचे,

प्रवरशयनकृत् - लोकविलक्षण अशाप्रकारचे श्रेष्ठ शयन असणाऱ्या,

सर्वलोकैकधर्ता - सर्व जगताला धारण करणारे. ही सर्व चवदा भुवनांची उतरंड श्रीशेषांनी मस्तकावर धारण केली आहे अशी आपल्या शास्त्राची मान्यता आहे.

सोऽनन्तः - ते भगवान अनंत, शेषराज.

सर्वभूतः पृथुविमलयशाः - संपूर्ण जगात ज्यांचे विशाल आणि शुद्ध यश पसरलेले आहे . सर्ववेदैश्च वेद्यः - सर्व ज्ञानाचाही आधार असणारे. पतंजली स्वरूपात अवतार धारण करून ज्यांनी योग्य व्याकरण इत्यादी सगळ्यांचे ज्ञान जगात पसरवले.

पाता विश्वस्य शश्वत् - सर्व विश्वाचे कायम पालन करणारे. सकलसुररिपुध्वंसनः - देवतांच्या सगळ्या शत्रूचा विनाश करणारे. युद्धामध्ये कायम देवतांच्या बाजूने उभे असलेले. भगवंताच्या अवतारांमध्ये त्यांच्यासोबत असलेले.

पापहन्ता- सर्व पापाचा विनाश करणारे.

सर्वज्ञः - सर्व काही जाणणारे.

सर्वसाक्षी - स्वतः अनंत असल्याने सर्व अंत असणाऱ्या गोष्टींचा शेवट साक्षी रूपात पाहणारे.

सकलविषभयात् पातु भोगीश्वरो नः - पाताळ लोकांमध्ये असणाऱ्या सर्व प्रकारच्या भोगांचे स्वामी असणारे ते भगवान श्री शेष आमचे सर्व प्रकारच्या विषांच्या भीतीपासून रक्षण करोत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३३७) श्री विष्णुपादादिकेशांत स्तोत्र -८

वाग्भूगौर्यादि भेदैर्विदुरिह मुनयो यां यदीयैश्च पुंसां
कारुण्यार्द्रैः कटाक्षैः सकृदपि पतितैः संपदः स्युः समग्राः ।
कुन्देन्दुस्वच्छमन्दस्मितमधुरमुखांभोरुहां सुंदराङ्गीं
वन्दे वन्द्यामशेषैरपि मुरभिदुरोमंदिरामिन्दिरां ताम् ।।८।।

प्रस्तुत श्लोकात भगवान जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज, श्रीवैकुंठनाथ सहचरी असणाऱ्या देवी लक्ष्मी चे गुण वैभव वर्णन करीत आहेत.

वाग्भूगौर्यादि भेदैर्विदुरिह मुनयो यां - वाणी म्हणजे सरस्वती, भू म्हणजे पृथ्वी, गो म्हणजे गोमाता, अशा विविध भेदांनी मुनी जिला जाणतात, अर्थात देवता, सृष्टी, जीव इत्यादी सगळ्यांमध्ये ज्या गोष्टींचा उल्लेख स्त्रिलिंगात केला जातो, त्या सगळ्या रुपात हीच नटली आहे अशा रूपात मुनी जिची स्तुती करतात.

यदीयैश्च पुंसां

कारुण्यार्द्रैः कटाक्षैः सकृदपि पतितैः संपदः स्युः समग्राः - जिचा सहज कारुण्यपूर्ण कृपा कटाक्ष एकदा जरी पडला तरी माणसाला सर्व प्रकारच्या संपत्ती कायम प्राप्त होतात.

कुन्देन्दुस्वच्छमन्दस्मितमधुरमुखा- कुंद पुष्प ,चंद्र यांच्याप्रमाणे स्वच्छ आणि मंदस्मित युक्त असे जिथे मुख आहे.

अंभोरुहां सुंदराङ्गीं - सांभाळणाऱ्या तिच्या मांड्या अत्यंत सुंदर आहेत.

वन्दे वन्द्यामशेषैरपि - सगळ्या वंदनीय देवतांना देखील वंदनीय असणारी. मुरभिदुरोमंदिरामिन्दिरां ताम् - मुर राक्षसाचा शत्रू असणाऱ्या भगवान श्री विष्णूच्या हृदयरूपी मंदिरात निवास करणाऱ्या, चहा देवी इंदिरा महालक्ष्मीला मी वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३३८) श्री विष्णुपादादिकेशांत स्तोत्र - ९

या सूते सत्त्वजालं सकलमपि सदा सन्निधानेन पुंसो
धत्ते या सत्त्वयोगाच्चरमचरमिदं भूतये भूतजालम् ।
धात्रींस्थात्रीं जनित्रीं प्रकृतिमविकृतिं विश्वशक्तिं विधात्रीं
विष्णोर्विश्वात्मनस्तां विपुलगुणमयीं प्राणनाथां प्रणौमि ।।९।।

भगवान विष्णूची पत्नी रूपात जसा देवी लक्ष्मी चा गौरव केला जातो तशाच स्वरूपात भूमातेला देखील विष्णू पत्नी स्वरूपातच वंदन केले जाते. त्या भूदेवीचे वर्णन करताना, भगवान जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज म्हणतात,

या सूते सत्त्वजालं सकलमपि सदा सन्निधानेन पुंसो - झी भगवंताच्या अधिष्ठानावर सत्व जालाच्या माध्यमातून हे संपूर्ण विश्व निर्माण करते.

या विश्वनिर्मितीच्या प्रक्रियेचा आरंभ सत्व गुणाच्या प्रगटीकरणाने होत असल्याने, पुढच्या सर्व प्रक्रियेला सत्वजाल असे म्हंटले आहे.

धत्ते या सत्त्वयोगाच्चरमचरमिदं भूतये भूतजालम् - त्या सत्वगुणाच्या आधारानेच जी या सर्व चराचर विश्वाला आणि प्राणिमात्रांना धारण करते. या सगळ्यांचा आधार होते.

धात्रीं - या सगळ्यांना धारण करणारी

स्थात्रीं - या सगळ्यांचे आधारस्थान असणारी.

जनित्रीं - सगळ्यांना निर्माण करणारी.

प्रकृतिमविकृतिं - प्रारंभिक निर्मिती आणि नंतर त्यातील सर्व बदल जिच्यामुळे होतात अशी.

विश्वशक्तिं - वैश्विक शक्ती असणारी.

विधात्रीं - मूल निर्मितीप्रक्रिया.

विष्णोर्विश्वात्मनस्तां - श्री विष्णूंचे विश्वात्मक स्वरूप असणारी.

विपुलगुणमयीं - असंख्य गुणांनी युक्त असणारी.

प्राणनाथां प्रणौमि - त्यांची प्राणप्रिय असणारी जी पृथ्वी, तिला मी वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

३३९) श्री विष्णुपादादिकेशांत स्तोत्र - १०

येभ्योऽसूयद्भिरुच्चैः सपदि पदमुरु त्यज्यते दैत्यवर्गैः
येभ्यो धर्तुं च मूर्ध्ना स्पृहयति सततं सर्वगीर्वाणवर्गः ।
नित्यं निर्मूलयेयुर्निशिततरममी भक्तिनिघ्नात्मनां नः
पद्माक्षस्यांघ्रिपद्मद्वयतलनिलयाः पांसवः पापपङ्कम् ।।१०।।

प्रस्तुत श्लोकात भगवान जगद्गुरु आद्य शंकराचार्य स्वामी महाराज, भगवान श्रीविष्णूच्या चरण कमला वरील धुळीचे वर्णन करीत आहेत. त्या चरणावर समर्पित केलेल्या पुष्पांचा परागकणांनाच येथे धूली म्हटलेले आहे.

त्या धूलीचा तीन वर्गांवर वेगवेगळे कसे तीन परिणाम होतात हे स्पष्ट करताना आचार्य श्री म्हणतात,

येभ्योऽसूयद्भिरुच्चैः सपदि पदमुरु त्यज्यते दैत्यवर्गैः -

ऊरुपद म्हणजे सर्वश्रेष्ठ जागा. अर्थात स्वर्ग. येथे भगवान विष्णूच्या चरण धूलीची केवळ जाणीव झाली तरी दैत्य ते स्थान सोडून देतात. अर्थात भगवंताच्या येण्याच्या आधीच दैत्य निघून जातात हा भाव.

येभ्यो धर्तुं च मूर्ध्ना स्पृहयति सततं सर्वगीर्वाणवर्गः - गीर्वाण वर्ग म्हणजे देवता. त्या सगळ्या या धूलीला आपल्या मूर्घा म्हणजे डोक्यावर घेण्याची इच्छा बाळगत असतात. अर्थात भगवंताच्या चरणी वंदनेची त्यांना सदैव लालसा असते.

नित्यं निर्मूलयेयुर्निशिततरममी भक्तिनिघ्नात्मनां नः - आम्हा भक्तांच्या हृदयातील सर्व दोष नष्ट करणारी ही चरणरज,

पद्माक्षस्यांघ्रिपद्मद्वयतलनिलयाः पांसवः पापपङ्कम् - भगवान विष्णूच्या चरणकमल द्वयावर अर्थात जोडीवर राहणारी ही चरण धूली आमच्या पाप रुपी चिखलाला नष्ट करो.

ज्याप्रमाणे माती टाकल्यानंतर चिखल नष्ट होतो तशी भगवंतांची चरण धूली लागल्यावर भक्तांची सर्व पापे नष्ट होतात.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**३४०) श्री विष्णुपादादिकेशांत स्तोत्र - ११**

रेखाः लेखाभिवन्द्याश्चरणतलगताश्चक्रमत्स्यादिरूपाः
स्निग्धाः सूक्ष्माः सुजाता मृदुललिततरक्षौमसूत्रायमाणाः ।
दद्युर्नो मंगलानि भ्रमरभरजुषा कोमलेनाब्धिजायाः
कम्रेणाम्रेड्यमाना किसलयमृदुना पाणिना चक्रपाणेः ।।११।।

भगवान श्रीविष्णूच्या चरणकमलावर असणाऱ्या विविध मंगल चिन्हांचे वर्णन शास्त्र ग्रंथामध्ये केलेली आहे.

अशा चिन्हांनी युक्त असणाऱ्या श्री चरणांचे वर्णन प्रस्तुत श्लोकात आचार्यश्री करीत आहेत. ते म्हणतात,

रेखाः लेखाभिवन्द्याश्चरणतलगताश्चक्रमत्स्यादिरूपाः - या चरणात तलावर अर्थात तळपायावर असलेल्या चक्र मत्स्य इत्यादी स्वरूपातील आकृती दाखवणाऱ्या रेषा सगळ्यांना अत्यंत वंदनीय आहेत.

स्निग्धाः - त्या अत्यंत सुकुमार ओलसर आहेत.

सूक्ष्माः - अतिशय नाजूक आहेत.

सुजाता - अत्यंत रेखीव स्वरूपात साकार झालेल्या आहेत.
मृदुललिततरक्षौमसूत्रायमाणाः - अत्यंत नाजुक अशा प्रकारच्या रेशमी धाग्यां प्रमाणे आहेत.

दद्युर्नो मंगलानि भ्रमरभरजुषा - ज्यांना कमळ समजून त्या चरणकमलावर भुंगे रुंजी घालत आहेत, ती चरणकमल आम्हाला मंगल प्रदान करोत.

त्यांचे वैशिष्ट्य सांगताना आचार्यश्री पुढे म्हणतात,

कोमलेनाब्धिजायाः - अब्धी म्हणजे समुद्र. त्यातून जन्माला आली ती म्हणजे देवी लक्ष्मी. कम्रेणाम्रेड्यमाना किसलयमृदुना पाणिना चक्रपाणेः - ती आपल्या कोमल, फुलांच्या पाकळी प्रमाणे नाजूक असणाऱ्या हाताने, अत्यंत आनंदाने ज्या चरणांची सेवा करीत आहे. ती भगवान चक्रपाणिंची चरण कमले, आमचे मंगल करोत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३४१) श्री विष्णुपादादिकेशांत स्तोत्र -१२

यस्मादाक्रामतो द्यां गरुडमणिशिलाकेतुदण्डायमाना-
दाश्च्योतंती बभासे सुरसरिदमला वैजयन्तीव कान्ता ।
भूमिष्ठो यस्तथान्यो भुवन्गृहबृहत्स्तंभशोभां दधानः ।
पातामेतौ पयोदोदर ललिततलौ पंकजाक्षस्य पादौ ॥१२॥

महाराज बलीने तीन पाऊले भूमीचे दान दिल्यानंतर वामन रूपधारी भगवान विष्णूंनी त्याला दिव्य दृष्टी दिली. एका पावलाने संपूर्ण स्वर्ग तर दुसऱ्या पावलाने संपूर्ण पृथ्वी आच्छादित केली. त्या प्रसंगाचे वर्णन करीत आचार्य श्री भगवान विष्णूच्या चरणकमलांचे वर्णन करीत आहेत. ते म्हणतात,

यस्मादाक्रामतो द्यां गरुडमणिशिलाकेतुदण्डायमाना- स्वर्गाला गवसणी घालण्यासाठी वाढवलेले चरणकमल गरुडमणी अर्थात चमकदार रत्नांनी सजवलेल्या राजदंडा प्रमाणे शोभून दिसत होते.

दाश्च्योतंती बभासे सुरसरिदमला वैजयन्तीव कान्ता - त्या पायाने आकाशातील ब्रम्हांडाचे कवच भेदल्याने तेथील पाणी गंगा स्वरूपात वाहू लागल्याने त्या प्रवाहाला जणू भगवंताच्या गळ्यातील वैजयंती माळेचे सौंदर्य प्राप्त झाले.

जशी भगवंताच्या गळ्यात ती माळ शोभते तशी गंगा चरणकमला भोवती शोभू लागली.

भूमिष्ठो यस्तथान्यो भुवन्गृहबृहत्स्तंभशोभां दधानः - दुसरे पाऊल म्हणजे जणूकाही ही या विश्वाचा आधारस्तंभ असल्या प्रमाणे शोभा धारण करीत होते.

अर्थात या पावलांने सगळ्या पृथ्वीला आधार दिलेला होता.

पातामेतौ पयोदोदर ललिततलौ पंकजाक्षस्य पादौ - मेघाच्या आतील भागाप्रमाणे जल म्हणजे जीवन पूर्ण असणारे, घनश्याम आणि विद्युत तेजाने चमकणारे, अत्यंत सुंदर असे ते कमलाक्ष भगवान विष्णूंचे चरणकमल आमचे संरक्षण करोत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३४२) श्री विष्णुपादादिकेशांत स्तोत्र -१३

आक्रामद्भ्यां त्रिलोकीमसुरसुरपती तत्क्षणादेव नीतौ
याभ्यां वैरोचनीन्द्रौ युगपदपि विपत्संपदोरेकधाम ।
ताभ्यां ताम्रोदराभ्यां मुहुरहमजितस्याञ्चिताभ्यामुभाभ्यां
प्राज्यैश्वर्यप्रदाभ्यां प्रणतिमुपगतः पादपंकेरुहाभ्याम् ।।१३।।

भगवान श्रीविष्णुंच्या चरणकमलांचे अलौकिकत्व वर्णन करताना आचार्य श्री म्हणतात,

भगवान श्रीविष्णु जगत पालक असल्याने त्यांना देव आणि दैत्य दोन्ही आपले आहेत. कोणत्याही एका समूहावर ते कधीच अन्याय होऊ देत नाहीत. त्यांच्या प्रत्येक लीलेतून ते सगळ्यांचेच कसे कल्याण करतात, ते बलीचा कथेतूनच कसे सिद्ध होते ते आचार्य आपल्यासमोर स्पष्ट करतात.

राजा बलि च्या नियमनासाठी वाढवलेल्या आणि पृथ्वीला व्यापणाऱ्या दोन पावलांच्या द्वारे त्यांनी देवराज इंद्र आणि राक्षस राज बली या दोघांचेही कल्याण केले आहे.

आक्रामद्भ्यां त्रिलोकीमसुरसुरपती तत्क्षणादेव नीतौ - त्रैलोक्याला गवसणी घालणाऱ्या त्या चरणकमलांनी सुरपती आणि असुरपती या दोघांनाही न्याय प्रदान केला.

याभ्यां वैरोचनीन्द्रौ युगपदपि विपत्संपदोरेकधाम - ज्यांनी विरोचन पुत्र बळीला आणि देवराज इंद्र यांना एकाच वेळी स्वर्ग आणि संपत्ती प्रदान केली.

ताभ्यां ताम्रोदराभ्यां मुहुरहमजितस्याञ्चिताभ्यामुभाभ्यां - त्यांचा आतला भाग अत्यंत लालबुंद आहे अशा, भक्त जी इच्छा धारण करतात ती क्षणात पूर्ण करणाऱ्या, त्या भगवान अजित म्हणजे ज्यांना कोणीही कधीच जिंकू शकत नाही अशा भगवान श्री विष्णूंच्या,

प्राज्यैश्वर्यप्रदाभ्यां प्रणतिमुपगतः पादपंकेरुहाभ्याम् - अत्यंत श्रेष्ठ असणाऱ्या, चरणी शरण आलेल्या भक्तांना सर्व प्रकारचे ऐश्वर्य प्रदान करणाऱ्या, श्रीविष्णूचा चरणकमलांना मी वारंवार वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**३४३) श्रीविष्णु पादादिकेशांत स्तोत्र - १४**

यभ्यो वर्णश्चतुर्थश्चरमत उदभूदादिसर्गे प्रजानां
साहस्री चापि संख्या प्रकटमभिहिता सर्ववेदेषु येषाम् ।
व्याप्ता विश्वंभरा यैरतिविततनोः विश्वमूर्तेर्विराजो
विष्णोस्तेभ्यो महद्भ्यः सततमपि नमोस्त्वंघ्रिपंकेरुहेभ्यः ।।१४।।

त्या चरणकमलांच्या अत्यंत व्यापक विशाल स्वरूपाचे वर्णन प्रस्तुत श्लोकात आचार्य श्री सादर करतात. ते म्हणतात,

यभ्यो वर्णश्चतुर्थश्चरमत उदभूदादिसर्गे प्रजानां - या चरणकमलांना पासून विश्वाच्या निर्मितीचा आरंभी प्राणिमात्रांच्या, जीवांच्या निर्मितीच्या वेळी, चार प्रकारच्या वर्णांची निर्मिती करण्यात आली आहे.

येथे मानवातील चार वर्ण हा एक अर्थ आहे तर त्याच प्रमाणे जरायुज, अंडज स्वेदज आणि उद्भिज अशा चार प्रकारच्या जीवांची निर्मिती हा अर्थ देखील अपेक्षित आहे.

साहस्री चापि संख्या प्रकटमभिहिता सर्ववेदेषु येषाम् - सर्व काही जाणणाऱ्या वेदांमध्ये त्यांचा महिमा प्रगट करताना त्यांची संख्या हजारच्या स्वरूपात सांगितली आहे.

सहस्रशीर्षा पुरुषः असा आरंभ असणाऱ्या पुरुषसूक्ता मध्ये वर्णन केलेल्या हजार डोके, हजार हात, हजार पाय या वर्णनाचा हा उल्लेख आहे.

करणारे आणि अशा स्वरूपात हजारो चरण असल्याने प्रत्येकाला वंदना चे स्थान उपलब्ध आहे.

व्याप्ता विश्वंभरा यैरतिविततनोः विश्वमूर्तेर्विराजो - विश्वाला व्यापणारे अत्यंत विशाल असणारे,

विष्णोस्तेभ्यो महद्भ्यः सततमपि नमोस्त्वंघ्रिपंकेरुहेभ्यः - श्रीविष्णूचा त्या महान चरणकमलांना वारंवार वंदन असो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३४४) श्री विष्णुपादादिकेशांत स्तोत्र -१५

विष्णोः पादद्वयाग्रे विमलनखमणिभ्राजिता राजते या
राजीवस्येव रम्या हिमजलकणिकालंकृताग्रा दलाली ।
अस्माकं विस्मयार्हाण्यखिलमुनिमनःप्रार्थनीयानि सेऽयं
दद्यादाद्यानवद्या ततिरतिरुचिरा मंगलान्यंगुलीनाम् ।।१५।।

भगवान श्रीविष्णूंच्या चरणतलाचे वर्णन केल्यानंतर आता आचार्यश्री त्या चरणाला असणाऱ्या अनुपमेय अंगुलींचे वर्णन करीत आहेत. ते म्हणतात,

विष्णोः पादद्वयाग्रे - भगवान श्री विष्णूंचा दोन्ही चरणांच्या अग्रभागी असणाऱ्या, विमलनखमणिभ्राजिता राजते या - अत्यंत विलोभनीय नख रूपी रत्नांनी शोभायमान असणाऱ्या, भगवंताच्या नखांची प्रदीप्तता जणू काही रत्नप्रभेला पराजित करीत आहे अशी रम्य कल्पना आचार्य मांडत आहेत.

राजीवस्येव रम्या - कमळाप्रमाणे रमणीय असणाऱ्या, हिमजलकणिकालंकृताग्रा दलाली - त्यांच्या दल म्हणजे त्या चरणरुपी कमळाच्या पाकळ्याच्या रांगेप्रमाणे असणाऱ्या, त्यावर दवबिंदू पडल्यानंतर त्या पाकळ्या जशा अधिकच मनोहारी होतात तशा स्वरूपात असणाऱ्या,

चरण ही कमल आहे, त्याची बोटे त्या कमळाच्या पाकळ्या आहेत ही कल्पना अत्यंत रमणीय आहे. एखाद्या महाकवींच्या काव्यात शोभण्यासारखी आहे.

अस्माकं विस्मयार्हाण्यखिलमुनिमनःप्रार्थनीयानि सेऽयं - आमच्यासाठी तसेच सर्व ऋषीमुनींच्या साठी विस्मयचकीत होण्याचे स्थान असणाऱ्या, अर्थात त्याच्या दर्शनाने सर्व विस्मयचकित होतात अशा, मनोमन सतत ते सर्व ऋषिमुनी ज्याची प्रार्थना करीत असतात अशा,

दद्यादाद्यानवद्या ततिरतिरुचिरा मंगलान्यंगुलीनाम् - अत्यंत मंगल असणाऱ्या त्या अंगुली आम्हाला तात्काळ अत्यंत सुंदर असणाऱ्या, विलोभनीय सुख देणाऱ्या सर्व बाबी प्रदान करोत.

अर्थात जो या चरणांगुलींचे चिंतन करतो त्याला सर्व सुखदायक गोष्टी सहज उपलब्ध होतात.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

### ३४५) श्रीविष्णु पादादिकेशांत स्तोत्र -१६

यस्यां दृष्ट्वामलायां प्रतिकृतिममराः स्वां भवन्त्यानमन्तः
सेन्द्राः सान्द्रीकृतेर्ष्यास्त्वपरसुरकुलाशंकयाऽऽतंकवन्तः ।
सा सद्यः सातिरेकां सकलसुखकरीं संपदं साधयेन्नः
चञ्चच्चार्वंशुचक्रा चरणनलिनयोश्चक्रपाणेर्नखाली ॥१६॥

भगवान श्रीविष्णूच्या चरणकमलांचे वर्णन करताना, त्यातही त्या चरणांगुलींना असणाऱ्या नयनमनोहर नखांचे वर्णन करताना आचार्य श्रींची प्रतिभा एखाद्या महाकवीला लाजवेल असे अलौकिक वर्णन करीत आहे.

त्यां नखांमुळे देवता वर्गाच्या होणारा गोंधळ वर्णन करताना आचार्य श्री म्हणतात,

यस्यां दृष्ट्वामलायां प्रतिकृतिममराः स्वां भवन्त्यानमन्तः
सेन्द्राः सान्द्रीकृतेर्ष्यास्त्वपरसुरकुलाशंकयाऽऽतंकवन्तः ।

त्या अत्यंत अमल म्हणजे स्वच्छ अशा नखांमध्ये चरणावर वंदन करायला आलेल्या देवतांची प्रतिबिंबे उमटतात.

या प्रतिबिंबांच्यामुळे आपल्या पूर्वीच दुसऱ्याच देवता येथे येऊन पोहोचलेल्या आहेत की काय? या कल्पनेने देवता गोंधळून जातात.

ही लोकविलक्षण कल्पना थोडी समजून घ्यायला हवी. भगवंताला आपण अनंत कोटी ब्रह्मांडनायक असे म्हणतो. या प्रत्येक ब्रह्मांडात त्या त्या ब्रह्मांडाच्या देवता आहेत. भगवंताच्या चरणाला वंदन करण्यासाठी आलेल्या देवतांना आपली प्रतिबिंबे दिसतात त्यावेळी त्यांना त्या दुसर्या ब्रह्मांडातील देवता आल्या की काय अशी शंका येते. असे अफाट वर्णन आचार्य श्री करीत आहेत.

सा सद्यः सातिरेकां सकलसुखकरीं संपदं साधयेन्नः - ज्यांना शरण आलेल्या आम्हाला काळ सर्व प्रकारच्या सुखदायी संपदा प्राप्त होतात.

चञ्चच्चार्वंशुचक्रा चरणनलिनयोश्चक्रपाणेर्नखाली - ज्यांच्या हालचालीमुळे त्या नखां परिवर्तित होणाऱ्या प्रकाशाचा खेळ सुरू असणारी ती नखे आमचे कल्याण करोत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**३४६) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र १७**

पादांभोजन्मसेवासमवनतसुरव्रातभास्वत्किरीट-
प्रत्युप्तोच्चावचाश्मप्रवरकरगणैश्चित्रितं यद्विभाति ।
नम्रांगानां हरेर्नो हरिदुपलमहाकूर्मसौन्दर्यहारि-
च्छायं श्रेयःप्रदायि प्रपदयुगमिदं प्रापयेत्पापमन्तम् ।।१७।।

भगवान श्री वैकुंठनाथांच्या अनुपमेय चरणतलाचे, चरणांगुलींचे मनोहारी वर्णन केल्यानंतर आता आचार्यश्री त्या चरणांच्या वरच्या भागाचे वर्णन करीत आहेत. बोटां पासून घोट्यापर्यंत मध्ये जो उंचवटा आहे त्याचे वर्णन त्यांनी प्रस्तुत श्लोकात केलेले आहे.

आचार्य श्री म्हणतात,

पादांभोजन्मसेवा - चरण रुपी अभोजन्म म्हणजे कमळांची सेवा करण्यासाठी, त्यावर वंदन करण्यासाठी,

समवनतसुरव्रात - जेव्हा सगळ्या देवतांचा समुदाय, त्यावर वाकतो. नमस्कारासाठी खाली झुकतो,

भास्वत्किरीट- तेव्हा त्यांच्या मस्तकावरील तेजस्वी मुकुटात मध्ये असणाऱ्या,

प्रत्युप्तोच्चावचाश्म - सर्वत्र प्रकाश पसरवणाऱ्या रत्नांच्या द्वारे

प्रवरकरगणैश्चित्रितं यद्विभाति - त्या रत्नातून विकीर्ण होणारी प्रभा पसरल्यामुळे जे अधिकच सुंदर दिसत आहे.

नम्रांगानां हरेर्नो - त्या सगळ्यांनी वंदन केलेल्या भगवान श्रीहरीच्या हरिदुपलमहाकूर्मसौन्दर्यहारि- पाचूनी मढवलेल्या मोठ्या कूर्माचे सौंदर्य धारण करणारे.

भगवंताचा पाय मध्यभागी उंचवटा असलेला आहे. त्यावर देवतांच्या मस्तकावरील मुकुटातील रत्नांचे तेज पसरले असल्याने त्याच्या ठिपक्या मुळे जणू काही तो उंचवटा एखाद्या कासवाच्या पाठीप्रमाणे शोभून दिसत आहे.

च्छायं श्रेयःप्रदायि प्रपदयुगमिदं प्रापयेत्पापमन्तम् - सर्व पापांचे निवारण करणारी ती चरण युगुले आम्हाला सर्व श्रेयस्कर गोष्टींचे प्रदान करणारी ठरोत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

### ३४७) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र -१८

श्रीमत्यौ चारुवृत्ते करपरिमलनानन्दहृष्टे रमायाः
सौन्दर्याढ्येन्द्रनीलोपलरचितमहादण्डयोः कान्तिचोरे ।
सूरीन्द्रैः स्तूयमाने सुरकुलसुखदे सूदितारातिसंघे
जंघे नारायणीये मुहुरपि जयतामस्मदंहो हरन्त्यौ ।१८।।

भगवान श्रीकृष्णांच्या चरणकमलांचे वर्णन केल्यानंतर आता थोडे वर सरकत आचार्य श्री भगवंताच्या पिंढऱ्यांचे म्हणजे घोट्यापासून गुडघ्यापर्यंतच्या भागाचे वर्णन करीत आहे. या भागाचे सगळ्यात मोठे वैशिष्ट्य म्हणजे देवी लक्ष्मी सतत या भागाला आपल्या हस्त कमलाने हळूवार चुरत असते. त्यामुळे त्यापासूनच आरंभ होतो. आचार्य श्री म्हणतात,

श्रीमत्यौ - देवी लक्ष्मीने युक्त असणाऱ्या,

चारुवृत्ते - सुंदर वर्तुळाकृती आकार असणाऱ्या,

करपरिमलनानन्दहृष्टे रमायाः - देवी लक्ष्मी ने आपल्या हाताने सेवा केल्यामुळे झालेल्या अत्यंत आनंदाने ज्यांच्यावर रोमांच उभे राहिले आहेत अशा,

सौन्दर्याढ्येन्द्रनीलोपलरचितमहादण्डयोः कान्तिचोरे - आपल्या सौंदर्याच्या द्वारे इंद्रनील मण्यापासून निर्माण केलेल्या एखाद्या स्तंभाचे सौंदर्य हरण करणारे, अर्थात तशा स्वरूपातील अत्यंत आकर्षक असणाऱ्या,

सूरीन्द्रैः स्तूयमाने - सर्व देवतांना सह देवराज इंद्राने त्याची स्तुती केली आहे अशा,

सुरकुलसुखदे - सर्व देवता रुपी समूहाला आनंद देणाऱ्या,

सूदितारातिसंघे - सर्व दैत्यांचा सहज विनाश करणाऱ्या,

जंघे नारायणीये मुहुरपि जयतामस्मदंहो हरन्त्यौ - आमच्या अहंकारादि समस्त पापांना दूर करणाऱ्या भगवान श्री नारायण यांच्या पिंढऱ्यांना वारंवार वंदन असो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**३४८) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र -१९**

सम्यक् साह्यं विधातुं सममपि सततं जंघयोः खिन्नयोर्ये
भारीभूतोरुदण्डद्वयभरणकृतोत्तंभभावं भजेते ।
चित्तादर्शं निधातुं महितमिव सतां ते समुद्गायमाने
वृत्ताकारे विधत्तां हृदि मुदमजितस्यानिशं जानुनी नः ।।१९।।

भगवान श्रीवैकुंठनाथ श्रीहरीच्या विविध अवयवांचे अलौकिक वैभव वर्णन करताना भगवान जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज या श्लोकांमध्ये भगवंताच्या गुडघ्यांचे वर्णन करीत आहेत.

शरीर रचनेमध्ये गुडघ्यांचे असणारे अत्यंत महत्त्वाचे स्थान लक्षात घेत आरंभी ते म्हणतात,

सम्यक् साह्यं विधातुं सममपि सततं जंघयोः खिन्नयोर्ये - भगवान श्री विष्णूचे हे दोन्ही गुडघे सातत्याने त्यांच्या शरीराचा भार उचलून थकून गेलेल्या पिंढऱ्यांना सतत साह्य करतात.

अर्थात भगवंताच्या विशाल देहाचा भार स्वतः पेलवत पायाला त्या कार्यात सहकार्य करतात.

भारीभूतोरुदण्डद्वयभरणकृतोत्तंभभावं भजेते - त्याचप्रमाणे अत्यंत मजबूत असल्यामुळे भारदस्तपणा ने जडावलेल्या दोन्ही मांड्यांना उचलण्याची शक्ती या पिढऱ्यांना प्रदान करतात.

चित्तादर्शं निधातुं महितमिव सतां ते समुद्गायमाने - सतत भक्तीने भगवंताचे महिमान अंगात असलेल्या भक्तांच्या चित्तांना ठेवण्याची ती सगळ्यात सुरक्षित जागा आहे.

भगवंताच्या गुडघ्यातील गोल पोकळी म्हणजे जणू भक्ताच्या चित्ताला सांभाळणारी सुरक्षित पेटी आहे अशी अद्भुतरम्य कल्पना आचार्य येथे करीत आहेत.

वृत्ताकारे विधत्तां हृदि मुदमजितस्यानिशं जानुनी नः - अत्यंत सुबक वर्तुळाकार असणाऱ्या त्या गुड यांनी आम्हाला नेहमी आनंद प्रदान करावा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३४९) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - ४९

देवो भीतिं विधातुः सपदि विदधतौ कैटभाख्यं मधुं चा-
प्यारोप्यारूढगर्वावधिजलधि ययोरादिदैत्यौ जघान ।
वृत्तावन्योन्यतुल्यौ चतुरमुपचयं बिभ्रतावभ्रनीला-
वूरू चारू हरेस्तौ मुदमतिशयिनीं मानसे नो विधत्ताम् ।।२०।।

प्रस्तुत श्लोकात आचार्य श्री भगवान श्री विष्णूच्या मांड्यांचे वर्णन करीत आहेत. त्यासाठी त्यांनी एका पौराणिक कथेचा आधार घेतला आहे.

विश्वाच्या आरंभी जेव्हा सर्वत्र केवळ जल पसरलेले होते, फक्त भगवान ब्रह्मदेव प्रगट होऊन आपले कार्य करीत होते, त्यावेळी योगनिद्रेत असलेल्या भगवान विष्णूच्या कानातून निघालेल्या मळाच्या थेंबापासून मधु आणि कैटभ या नावाचे दोन राक्षस जन्माला आले.

त्यांनी भगवान ब्रह्मदेवांवर आक्रमण केल्यावर त्यांनी योगनिद्रेची प्रार्थना केल्यामुळे तिचा प्रभाव दूर झालेल्या श्री विष्णूंनी या दोन्ही राक्षसांचा वध केला. तो कथाभाग आधाराला घेऊन आचार्य श्री म्हणतात,

देवो भीतिं विधातुः सपदि विदधतौ कैटभाख्यं मधुं चा-
प्यारोप्यारूढगर्वावधिजलधि ययोरादिदैत्यौ जघान - ज्यांनी सर्वत्र जल असताना आपल्या मांडीवर घेऊन मधु आणि कैटभ या नावाचा राक्षसांचा गर्व आणि भगवान ब्रह्मदेवांच्या मनातील भीती ,राक्षसांना मारून नष्ट केली.

वृत्तावन्योन्यतुल्यौ - अशा त्या अत्यंत गोलाकार असणाऱ्या आणि एकमेकींना समान असणाऱ्या

चतुरमुपचयं - सुंदर आकार असणाऱ्या

बिभ्रतावभ्रनीला - मेघाचा निळा रंग धारण करणाऱ्या

वूरू चारू हरेस्तौ मुदमतिशयिनीं मानसे नो विधत्ताम् - वान श्रीविष्णूच्या अत्यंत आनंद देणाऱ्या मांड्या आम्ही मनात धारण करतो. त्यांचे चिंतन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३५०) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - २१

पीतेन द्योतते यच्चतुरपरिहितेनांबरेणात्युदारं
जातालंकारयोगं जलमिव जलधेः बाडवाग्निप्रभाभिः ।
एतत्पातित्यदान्नो जघनमतिघनादेनसो माननीयं
सातत्येनेव चेतोविषयमवतरत्पातु पीतांबरस्य ।।२१।।

भगवंताच्या मांड्यांच्या वर गेल्यानंतर कमरेपाशी भगवंताने धारण केलेल्या पीतांबरा चे वर्णन प्रस्तुत श्लोकात आचार्यश्री करीत आहेत.

भगवान आपल्या घननील शरीरावर पीतांबर धारण करतात. त्या काळ्या निळ्या आणि पिवळ्या रंगाच्या संगतीने जे सौंदर्य निर्माण होते त्याचे वर्णन करताना आचार्य श्रींची प्रतिभा एखाद्या महाकवीला लाजवेल अशा स्वरूपात प्रगट होते. ते शब्दकळा योजितात,

पीतेन द्योतते यच्चतुरपरिहितेनांबरेणात्युदारं
जातालंकारयोगं जलमिव जलधेः बाडवाग्निप्रभाभिः - भगवान श्रीविष्णूंनी चतुर पद्धतीने परिधान केलेल्या अत्यंत सुंदर अशा पितांबराच्या मुळे त्यांची कंबर म्हणजे जणूकाही निळ्या सागरात उठलेल्या वडवाग्निच्या ज्वालांचे सौंदर्य धारण करते.

भगवंताच्या शरीराला समुद्राची आणि पितांबराला वडवानलाच्या ज्वालांची उपमा नितांत रमणीय आहे.

एतत्पातित्यदान्नो जघनमतिघनादेनसो माननीयं
सातत्येनेव चेतोविषयमवतरत्पातु पीतांबरस्य ।।२१।।



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३५१) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - २२

यस्या दाम्ना त्रिधाम्नो जघनकलितया भ्रजतेऽङ्गं यथाब्धेः
मध्यस्थो मन्दराद्रिर्भुजगपतिमहाभोगसंनद्धमध्यः
काञ्ची सा काञ्चनाभा मणिवरकिरणैरुल्लसद्भिः प्रदीप्ता
कल्यां कल्याणदात्री मम मतिमनिशं कम्ररूपा करोतु ।।२२।।

भगवान श्रीहरीच्या पीतांबरा चे वर्णन केल्यानंतर त्यावर कसलेल्या कंबरपट्ट्याकडे स्वाभाविकच लक्ष जाते. भगवान श्रीहरीच्या कमरेवर विराजमान त्या दिव्य मेखाले चे वर्णन प्रस्तुत श्लोकात आचार्य श्री करीत आहेत.

विष्णू शब्दाचा अर्थच परम व्यापक असा आहे. त्यामुळे भगवंताचे वर्णन करताना सगळ्याच गोष्टी अति भव्यदिव्य स्वरूपात वर्णन केल्या जातात.

मेखले चे वर्णन करताना अशा स्वरूपातील सर्वात विशाल मेखला कोणती? असा विचार करणाऱ्या आचार्य श्रींच्या प्रतिमेसमोर दृश्य साकारले ते समुद्रमंथनाचे.

समुद्रमंथन करण्यासाठी रवी म्हणून मंदर नावाच्या महान पर्वताला स्थापन करण्यात आले. तर दोरी म्हणून वासुकी सर्पाला उपयोगात आणले गेले. त्या संपूर्ण पर्वताला आणि आजूबाजूला असणाऱ्या संपूर्ण समुद्राला आपल्या विशाल तनुने आच्छादित करणाऱ्या त्या वासुकी ची उपमा आचार्य श्री देत आहेत. ते म्हणतात,

यस्या दाम्ना त्रिधाम्नो जघनकलितया भ्रजतेऽङ्गं यथाब्धेः - ज्याच्या दोरी स्वरूपाने संपूर्ण समुद्राचे अंग व्यापलेले होते,

मध्यस्थो मन्दराद्रिर्भुजगपतिमहाभोगसंनद्धमध्यः - मध्ये असलेल्या मंदर पर्वताला व्यापलेल्या त्या भुजगपती वासुकी प्रमाणे असणारी, भगवंताच्या समुद्राप्रमाणे विशाल निळ्या काळ्या शरीरावर लखलखणारी,

काञ्ची सा काञ्चनाभा - सोन्याची तेजस्वी असलेली ती मेखला, मणिवरकिरणैरुल्लसद्भिः प्रदीप्ता - तिच्यावर लावलेल्या असंख्य रत्नांच्या प्रभेने अति उज्वल दिसत आहे.

कल्यां कल्याणदात्री मम मतिमनिशं कम्ररूपा करोतु - अत्यंत निर्दोष असणारी, भक्तांना कल्याण प्रदान करणारी, ती मेखला माझी सतत कल्याण करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३५२) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - २३

उन्नम्रं कम्रमुच्चैरुपचितमुदभूद्यत्रपत्रैर्विचित्रैः
पूर्वं गीर्वाणपूज्यं कमलजमधुपस्यास्पदं तत्पयोजम् ।
तस्मिन्नीलाश्मनीलैस्तरलरुचिजलैः पूरिते केलिबुद्ध्या
नालीकाक्षस्य नाभीसरसि वसतु नश्चित्तहंसश्चिराय ।।२३।।

भगवान श्रीहरीच्या कमरेचे आणि त्यावरील मेखलेचे लोकविलक्षण सौंदर्य वर्णन केल्यानंतर आचार्य श्रींची प्रेम दृष्टी आणखी थोडी वर जाते. आणि त्यानंतर ती ज्या आनंद कल्लोळात डुबकी मारते ते स्थान म्हणजे भगवंताची नाभी.

त्या आनंद कुंडाचे वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

उन्नम्रं कम्रमुच्चैरुपचितमुदभूद्यत्रपत्रैर्विचित्रैः - ज्यामधून वर आलेले, कम्र म्हणजे अत्यंत विलोभनीय, हजारो पाकळे यांनी युक्त असलेले,

पूर्वं - विश्वातील सर्व प्रथम निर्मिती असणारे,

गीर्वाणपूज्यं - सगळ्या देवतांसाठी पूजनीय असलेले,

कमलजमधुपस्यास्पदं - कमळातून जन्माला आलेले ब्रह्मदेव हेच जणू त्यातील भुंगा असलेले,

तत्पयोजम् - ते दिव्य नाभिकमळ.

तस्मिन्नीलाश्मनीलैस्तरलरुचिजलैः पूरिते - नीलमण्याप्रमाणे तेजस्वी असलेली, भगवंताच्या शरीरातून निर्माण झालेल्या निळ्याच जलाने भरलेली,

केलिबुद्ध्या

नालीकाक्षस्य नाभीसरसि वसतु नश्चित्तहंसश्चिराय - आमच्या मनरूपी हंसाला क्रीडा बुद्धी झाल्याने त्याच्यासाठी मानस सरोवर आसमा नसणाऱ्या त्या आधी सरोवरात माझे मन अखंड राहो.

हंस जसा सतत अत्यंत निर्मळ जल असणाऱ्या मानस सरोवरात क्रीडा करण्याची इच्छा करतो.तेथेच त्याचे मन रमते. तसे माझे मन या भगवंताच्या नाभी कमल रुपी सरोवरात सतत आनंदमग्न राहो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**३५३) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - २४**

पातालं यस्य नालं वलयमपि दिशां पत्रपंक्तीं नगेन्द्रान्
विद्वांसः केसरालीर्विदुरिह विपुलां कर्णिकां स्वर्णशैलम् ।
भूयाद्रायत्स्वयंभूमधुकरभवनं भूमयं कामदं नो
नालीकं नाभिपद्माकरभवमुरुतन्नागशय्यस्य शौरेः ।।२४।।

भगवंताच्या नाभीचे अति दिव्य स्वरूप वर्णन केल्यानंतर त्यातून उत्पन्न झालेल्या या अनंत कोटी ब्रह्मांडाची प्रथम निर्मिती असणाऱ्या, निर्मितीचे कार्य करणाऱ्या ब्रह्मदेवांचे ही उत्पत्ती स्थान असणाऱ्या कमळाचे सकल ब्रम्हांड व्यापी वर्णन आचार्य श्री प्रस्तुत श्लोकात करीत आहेत.

ते म्हणतात,

पातालं यस्य नालं - सर्व चवदा भुवनांची पैकी सगळ्यात खालचा असलेला पातळ हेच ज्याचे देठ आहे.

वलयमपि दिशां - सगळ्या दिशा हेच ज्याचे पसरलेली स्वरूप आहे.

पत्रपंक्तीं नगेन्द्रान् - हिमालयासमान महान पर्वतराज त्याच्या पाकळ्या आहेत.

विद्वांसः केसरालीर्विदुरिह विपुलां - या ब्रम्हांडातील असंख्य विद्वान हेच ज्याच्या वरील केसर आहेत. त्यांच्यामुळे ज्याचा सुगंध पसरतो.

कर्णिकां स्वर्णशैलम् - सुवर्ण मंडित मेरू पर्वत ज्या च्या आत मध्ये असणारी कर्णिका आहे.

कमळाच्या आत असणाऱ्या पिवळ्या टपोऱ्या भागाला कर्णिका असे म्हणतात.

भूयाद्रायत्स्वयंभूमधुकरभवनं - भगवान ब्रह्मदेव रूपी भुंग्याचे जे निवासस्थान आहे .

भूमयं कामदं नो - ते आम्हाला परिपूर्ण इच्छित प्रदान करो.

नालीकं नाभिपद्माकरभवमुरुतन्नागशय्यस्य शौरेः - शेषावर शयन करणार्या, शूरसेनाच्या वंशात श्रीकृष्ण रूपात अवतार घेतल्यामुळे शौरी नाम असणाऱ्या श्रीविष्णूच्या नाभीतून निघालेले ते कमळ.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**३५४) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - २५**

कान्त्यंभ:पूरपूर्णे लसदसितवली भंगभास्वतरङ्गे
गम्भीरावर्तनाभीचतुरतरमहावर्तशोभिन्युदारे ।
क्रीडत्वानद्धहेमोदरनहनमहाबाडवाग्निप्रभाढ्ये
कामं दामोदरीयोदरसलिलनिधौ चित्तहंसश्चिरं नः ।।२५।।

भगवान श्री विष्णूच्या नाभीकमलाचे वर्णन केल्यानंतर, त्यातून उत्पन्न झालेल्या भगवान ब्रह्मदे वांचे जन्मस्थान असलेल्या कमळाचे वर्णन केल्यानंतर, भगवंताच्या संपूर्ण उदराचे एकत्रित स्वरूपातील वर्णन आचार्य श्री प्रस्तुत श्लोकात करीत आहेत. ते म्हणतात,

कान्त्यंभ:पूरपूर्णे - त्यांच्या शरीरकांतीने परिपूर्ण समुद्राप्रमाणे भासणारे,

भगवंताचे शरीर निळ्या रंगाचे आहे. ते अतिविशाल असल्याने त्याचा अंतपार नजरेच्या टप्प्यात येत नाही. त्यामुळे जणू काही भगवंताचे ते शरीर एखाद्या विशाल पसरलेल्या समुद्राप्रमाणे आहे असे आचार्य म्हणत आहेत.

लसदसितवली - भगवंताच्या उदरावर तीन वळ्या शोभून दिसत आहेत. यालाच त्रिवलीशोभित असे म्हणतात.

भगवंताच्या सगुण साकार रूपात चालत असणाऱ्या श्वासोच्छ्वासामुळे या वळ्या हलत आहेत.

भंगभास्वतरङ्गे - त्यामुळे त्या जणू काही लाटांप्रमाणे वाटत आहेत.

ही उपमा अत्यंत नयनमनोहर आहे.

गम्भीरावर्तनाभीचतुरतरमहावर्तशोभिन्युदारे - भगवंताची अत्यंत गंभीर असलेली नाभी एखाद्या विशाल भोवऱ्याप्रमाणे वाटत आहे.

क्रीडत्वानद्धहेमोदरनहनमहाबाडवाग्निप्रभाढ्ये - त्या कमरेचा भोवताल गुंडाळेला पितांबर जणु काही महान वडवाग्नीप्रमाणे तेजस्वी वाटत आहे.

कामं दामोदरीयोदरसलिलनिधौ चित्तहंसश्चिरं नः - अशा त्या दामोदर भगवान श्रीहरीच्या उदर रुपी सागरामध्ये आमचा मानस रूपी हंस सदैव विहार करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३५५) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र -२६

नाभीनालीकमूलादधिकपरिमलोन्मोहितानामलीनां
माला नीलेव यान्ती स्फुरति रुचिमती वक्रपद्मोन्मुखी या ।
रम्या सा रोमराजिर्महितरुचिकरी मध्यभागस्य विष्णोः
चित्तस्था मा विरंसीच्चिरतरमुचितां साधयन्ती श्रियं नः ।।२६।।

भगवान श्रीहरीच्या या अद्वितीय उदराचे सौंदर्य पाहत असताना आचार्य श्रींची दृष्टी अधिकच सूक्ष्म होत जाते. त्यावेळी त्या उदरावर असणारी कोमल रोमावली त्यांच्या नजरेत भरते.

नाभीपासून सुरू होत वरच्या दिशेने गेलेल्या त्या रोमावलीचे म्हणजे केसांच्या रांगेचे वर्णन या श्लोकात आचार्य श्री करीत आहेत.

त्या रोमावलीचा ऊर्ध्वगामी अर्थात वर जात असण्याचे आचार्य श्रींनी दिलेले कारण देखील अत्यंत मनोहारी आहे.

आचार्य श्री म्हणतात,

नाभीनालीकमूलादधिकपरिमलोन्मोहितानामलीनां - भगवंताच्या नाभिकमलातून निघून वरच्या दिशेला जाणारी ही रोमावली म्हणजे जणूकाही भुंग्यांची रांग आहे. ती त्या नाभी कमलावर आकर्षित झाली होती.

माला नीलेव यान्ती स्फुरति रुचिमती वक्रपद्मोन्मुखी या - मात्र आता त्यापेक्षाही अधिक सुगंध देणाऱ्या मुख कमला च्या दिशेने ती वरच्या दिशेने जात आहे.

नाभिकमळातून वर जात असलेली रोमावली ही जणू भुंग्यांची रांग आहे आणि ती मुखकमलाच्या दिशेने वर जात आहे, या दोन्ही कल्पना एखाद्या महाकाव्यात शोभून दिसतील इतक्या रमणीय आहेत.

रम्या सा रोमराजिर्महितरुचिकरी मध्यभागस्य विष्णोः - भगवान श्रीविष्णूच्या मध्य भागात असणारी सगळ्यांना श्रेष्ठ गोष्टी प्रदान करणारी ती रम्य अशी रोमावली,

चित्तस्था मा विरंसीच्चिरतरमुचितां साधयन्ती श्रियं नः - माझ्या चित्तात सदैव विलसत असो. ती सदैव व माझे सर्व उचित कल्याण साधत असो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**३५६) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - २७**

आदौ कल्पस्य यस्मात् प्रभवति सततं विश्वमेतद्विकल्पैः
कल्पान्ते यस्य चान्तः प्रविशति सकलं स्थावरं जंगमं च ।
अत्यन्ताचिन्त्यमूर्तेश्चिरतरमजितस्यान्तरिक्षस्वरूपे
तस्मिन्नस्माकमन्तःकरणमतिमुदा क्रीडतात् क्रोडभागे ।।२७।।

भगवान श्री विष्णूच्या उदराचे असे बाह्य स्वरूप वर्णन केल्यानंतर त्याचा वास्तविक अंतरंग स्वरूपाचे वर्णन आचार्य श्री प्रस्तुत श्लोकात करीत आहेत.

सकाळ विश्वाच्या उत्पत्ती, स्थिती आणि लयाचा आधार असणाऱ्या त्या महा उदराबद्दल आचार्य श्री येथे तात्त्विक भूमिका मांडत आहेत.

ते म्हणतात,

आदौ कल्पस्य यस्मात् प्रभवति सततं विश्वमेतद्विकल्पैः - ज्याच्यातून कल्पाच्या आरंभी अर्थात ब्रह्मदेवांनी ही सृष्टी निर्माण करण्याच्या काळाच्या आरंभी, हे सर्व विश्व त्यातील सर्व प्रकारच्या विकल्पांसह निर्माण होते.

अर्थात या विश्वातील प्रत्येक पदार्थ शेवटी भगवंता पासूनच प्रगट होतो.या सगळ्याचा मूळ स्रोत श्रीहरींनींचे उदरच असते.

कल्पान्ते यस्य चान्तः प्रविशति सकलं स्थावरं जंगमं च - कल्पाच्या अन ती म्हणजे प्रणय काळी हे सर्व स्थावर आणि जंगम विश्व ज्याच्या मध्ये प्रवेश करते.

अत्यन्ताचिन्त्यमूर्तेश्चिरतरमजितस्यान्तरिक्षस्वरूपे - अशा त्या अत्यंत अचिंत्य अर्थात कल्पनेच्या पार असणाऱ्या, भगवान श्री विष्णूच्या अंतरिक्ष स्वरूप म्हणजे अपार अशा,

तस्मिन्नस्माकमन्तःकरणमतिमुदा क्रीडतात् क्रोडभागे - उदर रुपी सागराच्या किनाऱ्यावर आमचे अंतकरण आनंदाने क्रीडा करीत राहो.

जोपर्यंत त्यात विलीन होत नाही तोपर्यंत त्याच्या सौंदर्याचा आनंद घेत राहो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

### ३५७) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - २८

संस्तीर्णं कौस्तुभांशुप्रसरकिसलयैर्मुग्धमुक्ताफलाढ्यं
श्रीवत्सोल्लासिफुल्लप्रतिनववनमालांशुराजत्भुजान्तम् ।
वक्षः श्रीवृक्षकान्तं मधुकरनिकरश्यामलं शार्ङ्गपाणः
संसाराध्वश्रमार्तैरुपवनमिव यत्सेवितं तत्प्रपद्ये ।।२८।।

भगवान श्री विष्णूंच्या उदराचे नितांत मनोहर वर्णन केल्यानंतर स्वाभाविक आणखीन वर गेलेली आचार्यश्रींची दृष्टी भगवंताच्या विशाल वक्षस्थलावर रुळते. त्याचे अद्वितीय वर्णन करताना आचार्य श्री म्हणतात,

संस्तीर्णं कौस्तुभांशुप्रसरकिसलयैर्मुग्धमुक्ताफलाढ्यं - भगवान श्रीहरीच्या वक्षस्थळावर समुद्रमंथनातून प्राप्त झालेला कौस्तुभ नावाचा दिव्य मणी विराजमान असतो. त्याच्या मधून निघणारे दिव्य प्रकाश किरण सर्वत्र पसरलेले आहेत. ते जणूकाही एखाद्या पुष्पातून निघालेल्या केसरा प्रमाणे सुंदर दिसत आहेत. त्यांनी भगवंताच्या गळ्यातील मोत्यांच्या माळा अधिकच आकर्षक दिसत आहेत.

श्रीवत्सोल्लासिफुल्लप्रतिनववनमालांशुराजत्भुजान्तम् - भगवंताच्या छातीवर श्रीवत्स चिन्ह शोभून दिसत आहे. ( याचे अधिक स्पष्टीकरण पुढच्या श्लोकात येईल.) नवनवीन फुलांच्या माळा धारण करणाऱ्या ते दोन भुजांच्यामधील भाग म्हणजे वक्षस्थल प्रफुल्लित वाटत आहे.

वक्षः श्रीवक्षकान्तं - देवी लक्ष्मी चे अत्यंत प्रिय असणारे ते श्रीहरींचे वक्षस्थळ , मधुकरनिकरश्यामलं - भुंग्यांच्या समुहात प्रमाणे काळे-निळे शोभत आहे

शार्ङ्गपाणः

संसाराध्वश्रमार्तैरुपवनमिव यत्सेवितं तत्प्रपद्ये - संसार रुपी मार्गक्रमण करून थकलेल्या जीवांना शांत आराम करावे असे उपवन वाटणारे ते भगवान शार्ङ्पाणी यांचे वक्षस्थळ जी इच्छा कराल ती पूर्ण करणारे आहे.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

### ३५८) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - २९

कान्तं वक्षो नितान्तं विदधदिव गलं कालिमा कालशत्रोः
इन्दोर्बिम्बं यथाङ्को मधुप इव तरोर्मंजरीं राजते यः ।
श्रीमान्नित्यंविधेयादविरलमिलितः कौस्तुभश्रीप्रतानैः
श्रीवत्सः श्रीपतेः स श्रिय इव दयितो वत्स उच्चैः श्रियं नः ।।२९।।

या श्लोकात भगवान विष्णूंच्या छातीवर असणाऱ्या श्री व चिन्हाचे वर्णन आचार्य श्री करीत आहेत. यामागे एक पौराणिक कथा आहे. भगवान ब्रह्मदेव, भगवान विष्णू आणि भगवान शंकर यामध्ये श्रेष्ठ कोण? याची परीक्षा पाहण्याचे काम सर्व ऋषींनी महर्षी भृगूंना सोपवले. महर्षींनी तिघांचाही अपमान केला. या अपमानाने दोघे संतापले. मात्र श्रीविष्णू शांतच होते. त्यांना आणखीन चिडवण्यासाठी भृगूंनी त्यांच्या छातीवर लाथ मारली. मात्र तरीही शांत असणाऱ्या भगवंतांनी ते ऋषीचे चरणकमल आपल्या छातीवर कायमचे धारण केले. भगवंताच्या अत्यंत शांत आणि क्षमाशील वृत्तीचे प्रतीक असणाऱ्या या चिन्हाला श्रीवत्स असे म्हणतात.

वास्तविक तो पायाचा डाग आहे पण तो सुद्धा किती सुंदर दिसतो हे सांगण्यासाठी अन्य उदाहरणे देत आचार्य श्री म्हणतात,

कान्तं वक्षो नितान्तं - त्या श्रीवत्सा ने भगवंताचे वक्षस्थळ अत्यंत सुंदर दिसत आहे.

विदधदिव गलं कालिमा कालशत्रोः - जसे हालाहल पिण्यामुळे काळाचा शत्रू असणाऱ्या महाकाल भगवान शंकरांचा काळा सुंदर दिसतो.

इन्दोर्बिम्बं यथाङ्को - जसा चंद्रावर डाग असला तरी तो शोभून दिसतो.

मधुप इव तरोर्मंजरीं राजते यः - वर काळा बेढब भुंगा बसला तरी झाडाचा फुलोरा सुंदर दिसतो.

श्रीमान्नित्यंविधेयादविरलमिलितः कौस्तुभश्रीप्रतानैः - भगवंताच्या छातीवर नित्य विराजित, कौस्तुभमण्याच्या प्रकाशाने प्रकाशित झालेले,

श्रीवत्सः श्रीपतेः स श्रिय इव दयितो वत्स उच्चैः श्रियं नः - भगवान श्री पतीच्या छातीवरील श्रीवत्स जणू त्यांची संपत्ती आहे. श्रीवत्स आम्हाला श्रेष्ठ कल्याण प्रदान करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३५९) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - ३०

संभूयांभोधिमध्यात्सपदि सहजया यः श्रिया संनिधत्ते
नीले नारायणोरस्थल गगनतले हारतारोपसेव्ये
आशाः सर्वाः प्रकाशा विदधदपिदधच्चात्मभासान्यतेजां-
स्याश्चर्यस्याकरो नो द्युमणिरिव मणिः कौस्तुभः सोऽस्तु भूत्यै ॥३०॥

यानंतर आचार्य श्री भगवान श्रीविष्णूच्या वक्षस्थळा वर विराजमान असणाऱ्या कौस्तुभ रत्नाचे वर्णन करीत आहेत.

ते म्हणतात,

संभूयांभोधिमध्यात्सपदि सहजया यः श्रिया संनिधत्ते - जे समुद्रमंथनाच्या मधून निर्माण झाले. जे सहजपणे सर्व वैभवाला एकत्रित धारण करते.

या ओळीत आचार्यांनी त्याच्या दोन महत्त्वाच्या गोष्टींचे वर्णन केले आहे. समुद्रमंथनाच्या वेळी समुद्रातून जी चौदा रत्ने निर्माण झाली यापैकी एक महत्त्वाचे रत्न म्हणजे कौस्तुभ.

ते सहजपणे सर्व वैभव एकत्र करते याचा अर्थ संपूर्ण विश्वातील सर्व वैभव एका बाजूला आणि भगवंताच्या गळ्यातील हे कौस्तुभ रत्न एकाबाजूला. तरीही तेच अधिक मौल्यवान ठरेल. असे त्याचे वैभव आचार्यश्री वर्णन करतात.

नीले नारायणोरस्थल गगनतले हारतारोपसेव्ये - भगवंताच्या नीलवर्णीय वक्षस्थळ रुपी गगना मध्ये असणाऱ्या मोत्यांच्या माळा मधील मोती रूपी तारकांच्या मधी चंद्राप्रमाणे शोभणारे,

आशाः सर्वाः प्रकाशा विदधदपिदधच्चात्मभासान्यतेजां- सर्व प्रकारच्या प्रकाशांची आपण अधिक तेजस्वी ही आशा मावळून टाकणाऱ्या, त्यांचे तेज हरण करणाऱ्या त्या कौस्तुभ मण्याकडे

स्याश्चर्यस्याकरो नो द्युमणिरिव मणिः - सूर्याप्रमाणे चमकदार असल्यामुळे आश्चर्याला कारणीभूत असणाऱ्या त्याकडे पाहणाऱ्या, आमच्या सगळ्यांच्या साठी,

कौस्तुभः सोऽस्तु भूत्यै - ते कौस्तुभ रत्न कल्याणाचे कारण ठरो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३६०) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र -३१

या वायावानुकूल्यात्सरति मणिरुचा भासमानासमाना
साकं साकंपमंसे वसति विदधते वासुभद्रं सुभद्रं ।
सारं सारंगसंघैर्मुखरित कुसुमा मेचकांता च कांता
माला मालालितास्मात्र विरमतु सुखैः योजयन्ती जयन्ती ।।३१।।

भगवान श्रीविष्णुच्या वक्षस्थळावरील श्रीवत्स चिन्हाचे आणि कौस्तुभ मण्याचे सौंदर्य वर्णन केल्यानंतर आचार्य श्रींची दृष्टी तेथे असणाऱ्या अत्यंतिक वैभवसंपन्न अशा वैजयंती माले कडे जाते. त्या अम्लान अर्थात कधीही न कोमेजनाऱ्या माळेचे वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

या वायावानुकूल्यात्सरति - भगवान श्रीविष्णु ज्या क्षीरसागरात शांतपणे पहुडले आहेत तेथे वाहणार्या वार्याने ती माळ सळसळत असते.

मणिरुचा भासमाना - कौस्तुभ मण्याच्या तेजा प्रमाणेच चकचकित असणारी.

असमाना - जिच्या समान जगात दुसरी कोणतीही माला नाही अशी. अनुपमेय. अतुलनीय.

साकं साकंपमंसे वसति विदधते वासुभद्रं सुभद्रं - अत्यंत सुंदर असणारी ती मला आपल्या प्रत्येक हालचालीने भगवान श्री विष्णूंना आनंद प्रदान करते.

सारं सारंगसंघैर्मुखरित - तिच्यावर रुळणाऱ्या भुंग्यांनी केलेल्या गुंजारवाला मुळे जणूकाही तीच आवाज करत आहे असे वाटणारी.

कुसुमा मेचकांता च कांता - निळ्या कमळाच्या फुलानी निर्माण केली असल्यामुळे नीलकांतीने शोभून दिसणारी. अतीव रमणीय असणारी.

माला मालालितास्मात्र विरमतु सुखैः योजयन्ती जयन्ती - ती वैजयंतीमाला आम्हाला अखंड सुखाची माला अर्थात रांग प्रदान करो. माला शब्दाचे दोन अर्थ आचार्यांनी येथे मोठ्या खुबीने योजले आहेत. पुष्पांची समूह रचना असा गळ्यातील माळे करता शब्द वापरला तर सुखांच्या अनवरत प्राप्तीसाठी सुख माला शब्द वापरला. भगवंताच्या गळ्यातील ती वैजयंतीमाला आम्हाला देखील विजय प्रदान करो. ती गळ्यात असलेल्याचा कधीच पराजय होत नाही, विजयच विजय असतो या अर्थानेच तिला वैजयंती असे म्हटले आहे



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**३६१) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - ३२**

हारस्योरुप्रभाभिः प्रतिवनवनमालांशुभिः प्रांशुभिर्यत्
श्रीभिश्चाप्यङ्गदानां शबलितरुचिभिः निष्कभाभिश्च भाति ।
बाहुल्येनेव बद्धाञ्जलिपुटमजितस्याभियाचामहे तद्
बन्धार्तिं बाधतां नो बहु विहतिकरीं बन्धुरं बाहुमूलम्
।।३२।।

भगवंताच्या गळ्यातील वैजयंतीमाला चे वर्णन केल्यानंतर ती माला ज्या विशाल खांद्यांवर आधारलेली आहे त्या भगवंताच्या खांद्यांचे वर्णन करतांना आचार्य श्री प्रस्तुत श्लोकात म्हणतात,

हारस्योरुप्रभाभिः - मोत्यांच्या माळा मधून बाहेर पडणाऱ्या तेजाने,

प्रतिवनवनमालांशुभिः - केलेल्या ताज्या फुलांचे सौंदर्यरूपी किरणांनी, प्रांशुभिर्यत् - जे लखलखीत दिसत आहेत.

श्रीभिश्चाप्यङ्गदानां - अंगद म्हणजे बाजूबंद. त्या खांद्यावर धारण केलेल्या रत्नखचित सुवर्ण निर्मित बाजूबंदांमुळे

शबलितरुचिभिः - तेजाने झाकाळून गेलेले,

निष्कभाभिश्च भाति - निष्क म्हणजे सोन्याचे पात्र. त्याप्रमाणे लखलखीत भासणारे,

बाहुल्येनेव बद्धाञ्जलिपुटमजितस्याभियाचामहे तद् - असंख्य भक्तगण ज्या भगवंताची हात जोडून प्रार्थना करतात, ज्याच्या समोर आपल्या इच्छित गोष्टींची कामना करतात,

बन्धार्तिं बाधतां नो बहु विहतिकरीं बन्धुरं बाहुमूलम् - त्या सगळ्यांच्या सर्व दुःखांना पेलून धरणारे, भगवंताच्या हातांचे मूळ असणारे, तेथे भगवंताचे विशाल खांदे, आमच्या दुःखांना दूर करोत.

सगळ्या अनंत कोटी ब्रह्मांडांचा ज्या खांद्यावर आहे ते खांदे आमच्या दुःखाचा भार सहन करोत ही आचार्यकृत प्रार्थना किती सुंदर आहे.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली


विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११


## ३६२) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - ३३

विश्वत्राणैकदीक्षास्तदनुगुणगुणक्षत्रनिर्माणदक्षाः
कर्तारो दुर्निरूपाः स्फुटगुरुयशसां कर्मणामद्भुतानाम् ।
शार्ङ्गं बाणं कृपाणं फलकमरिगदे पद्मशंखौ सहस्रं
बिभ्राणः शस्त्रजालं मम ददतु हरेः बाहवो मोहहानिम्
॥३३॥

भगवान श्रीविष्णूंना सहस्रबाहू असे म्हटले जाते. सामान्य अवस्थेत जरी भगवान चतुर्भुज दिसत असलेले तरी आवश्यकतेनुसार ते आपल्या हजारो हातांना प्रगट करतात. त्यावेळी ते आपल्या हातात अनेक आयुधे धारण करतात. त्या सगळ्यांच्या सह भगवंताच्या बाहूंचे वैभव आचार्यश्रींनी या श्लोकाचा स्पष्ट केले आहे.

विश्वत्राणैकदीक्षास्तदनुगुणगुणक्षत्रनिर्माणदक्षाः - सगळ्या विश्वाचे रक्षण करण्याची जणु काही त्या हातांनी दीक्षाच घेतली आहे. तशीच दीक्षा घेणार आहे, त्याच्या गुणांचे अनुसरण करणारे क्षत्रिय भगवंताच्या त्याच बाहू पासून निर्माण होतात.

कर्तारो - संपूर्ण विश्वाचे पालन करणाऱ्या,

दुर्निरूपाः - ज्यांच्या स्वरूपाचे वर्णन करणे अत्यंत कठीण आहे अशा,

स्फुटगुरुयशसां - अत्यंत श्रेष्ठ यशाने संपन्न असणाऱ्या, कर्मणामद्भुतानाम् - अद्भुत प्रकारचे कर्म करणाऱ्या,

शार्ङ्गं - शार्ङ नावाचा धनुष्याला धारण करणाऱ्या,

बाणं - विविध प्रकारचे बाण,कृपाणं - तलवार, फलकम् - ढाल अरि - चक्र, गदे- गदा पद्मशंखौ - कमळ तथा शंख अशा विविध वस्तूंना धारण करणारे,

सहस्रं बिभ्राणः शस्त्रजालं - हजारो प्रकारच्या शस्त्रांना लीलया सांभाळणारे,

मम ददतु हरेः बाहवो मोहहानिम् - भगवान श्रीहरींचे ते दिव्य बाहू माझ्या मोहाला नष्ट करणारे ठरोत



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

३६३) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र -३४

कण्ठाकल्पोद्गतैर्यः कनकमयलसत् कुण्डलोस्रैरुदारै-
रुद्योतैः कौस्तुभस्याप्युरुभिरुपचितः चित्रवर्णो विभाति ।
कण्ठाश्लेषे रमायाः करवलयपदैः मुद्रिते भद्ररूपे
वैकुण्ठीयेऽत्र कण्ठे वसतु मम मतिः कुण्ठभावं विहाय ।।३४।।

भगवान श्रीविष्णूंच्या विशाल बाहूंचे, स्कंधांचे वर्णन केल्यानंतर आता पूज्यपाद आचार्य श्री भगवंताच्या दिव्य कंठाचे वर्णन करीत आहेत.

त्या गळ्यामध्ये असणाऱ्या विविध रत्नमालिकांच्या प्रभेने उजळून निघालेल्या त्या कंठ प्रदेशाचे वर्णन करताना आचार्य श्री म्हणतात,

कण्ठाकल्पोद्गतैर्यः कनकमयलसत् कुण्डलोस्रैरुदारै-
रुद्योतैः - या भगवंताच्या गळ्यामध्ये धारण केलेल्या विविध रत्नांच्या प्रभा तेथे पसरलेल्या आहेत. त्यातच कानात धारण केलेल्या सुवर्ण निर्मित मकर कुंडलांना जडावलेल्या अनमोल रत्नांची प्रभा मिसळलेली आहे.

त्या दोन्हींचा एकत्रीकरणाने तो कंठ प्रदेशात अधिकच उजळलेला आहे. कौस्तुभस्याप्युरुभिरुपचितः चित्रवर्णो विभाति - त्यामध्ये गळ्यात धारण केलेल्या कौस्तुभमण्यामधून बाहेर पडणाऱ्या विविधरंगी प्रकाश परिवर्तनाने तो कंठ विविध रंगांनी शोभून दिसत आहे.

कण्ठाश्लेषे रमायाः करवलयपदैः मुद्रिते भद्ररूपे - देवी रमा अर्थात भगवती लक्ष्मीने या कंठाला घट्ट आलिंगन दिले आहे. त्यावेळी तिच्या हातामध्ये असणाऱ्या कंकणांनी निर्माण झालेल्या सुंदर वळ्या त्या कंठा ची शोभा वृद्धिंगत करीत आहेत.

आईच्या हातातील कड्यांचा दाब पडून निर्माण झालेल्या या आकृत्या जणू त्यांच्या उत्कट प्रेमाचे प्रतीक आहेत.

वैकुण्ठीयेऽत्र कण्ठे वसतु मम मतिः कुण्ठभावं विहाय - जेथे सर्व गोष्टी कुंठित होतात अर्थात जेथे वर्णनाचे शब्द कमी पडतात अशाच या कंठाच्या ठिकाणी स्वतःचा कुंठीत भाव सोडून म्हणजे मुक्तपणे माझी बुद्धी निवास करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

३६४) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - ३५

पद्मानन्दप्रदाता परिलसदरुणश्रीपरीताग्रभागः
काले काले च कम्बुप्रवर शशधरापूरणे यः प्रवीणः ।
वक्त्राकाशान्तरस्थस्तिरयति नितरां दन्ततारौघशोभाम्
श्रीभर्तुर्दन्तवासोद्युमणिरघतमोनाशनायास्त्वसौ नः ।।३५।।

भगवंतांच्या कंठाच्या लोकविलक्षण सौंदर्याचे वर्णन केल्यानंतर अधिक उन्नत झालेली आचार्य श्रींची प्रतिभा भगवंताच्या अधरोष्ठावर म्हणजे खालच्या ओठावर खिळते. त्या अतिदिव्य रसपूर्ण ओठाचे वर्णन करताना आचार्य श्री म्हणतात,

पद्मानन्दप्रदाता - कमळामध्ये निवास करणाऱ्या देवी पद्मा अर्थात महालक्ष्मीला अद्वितीय आनंद प्रदान करणारा, परिलसदरुणश्रीपरीताग्रभागः - अरुणोदयकाली आसमंतात फाकलेल्या दिव्य लाल रंगाने शोभणाऱ्या सर्व गोष्टींमध्ये पुढे असलेला. अर्थात सर्व लाल रंगाच्या वस्तूंमध्ये सर्वश्रेष्ठ लाल रंग धारण करणारा,

काले काले च कम्बुप्रवर शशधरापूरणे यः प्रवीणः - विविध समयी वाजवण्यासाठी जवळ धरल्यामुळे चंद्राप्रमाणे पांढऱ्याशुभ्र असणाऱ्या पांचजन्य शंखाला पूर्णत्व प्रदान करणारा. शंखा आवाज निघाला तरच शंख पूर्ण उपयोगाचा झाला असा भाव आहे.

वक्त्राकाशान्तरस्थस्तिरयति नितरां दन्ततारौघशोभाम् - मुखाच्या आत असणाऱ्या दंत रुपी नक्षत्रांच्या तेजाला झाकाळून टाकणाऱ्या सूर्याप्रमाणे असणाऱ्या.

श्रीभर्तुर्दन्तवासोद्युमणिरघतमोनाशनायास्त्वसौ नः - ज्यामध्ये आकाशातील नक्षत्रा प्रमाणे असणारे भगवंताचे दात निवास करतात तो सकल अंधकाराचा विनाश करणारा भगवंताचा अधरोष्ठ आमच्या पापाचे निवारण करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

३६५) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - ३६

नित्यं स्नेहातिरेकान्निजकमितुरलं विप्रयोगाक्षमा या
वक्त्रेन्दोरन्तराले कृतवसतिरिवाभाति नक्षत्रराजिः ।
लक्ष्मीकान्तस्य कान्ताकृतिरतिविलसन्मुग्धमुक्ताफलश्रीः
दन्ताली संततं सा नतिनुतिनिरतान् रक्षतादक्षता नः ।।३६।।

भगवंताच्या त्या ओठाचे वर्णन केल्यानंतर त्याच्या हालचाली नंतर आतून डोकावणाऱ्या दंतपंक्ती कडे आचार्यश्रींचे लक्ष जाते. त्या अनुपमेय सौंदर्य धारण करणाऱ्या दंत मालिकेचे वर्णन करताना आचार्य श्री म्हणतात,

नित्यं स्नेहातिरेकान्निजकमितुरलं विप्रयोगाक्षमा या - त्या दंतपंक्ती चे भगवान विष्णूंवर आत्यंतिक प्रेम असल्याने, आपल्या प्रेमाचा आधार असलेल्या भगवंताला त्या कधीही सोडून जात नाहीत.

येथे दात सोडून जाणे म्हणजे दात पडणे. दात पडणे हे म्हातारपणाचे लक्षण आहे. भगवंत चिरतरुणच असल्याने वृद्धत्व इ. विकार यांच्या ठिकाणी संभवत नसल्याने त्यांचे दात पडण्याचा प्रश्नच येत नाही. त्यांच्या दातांची शाश्वतता वर्णन करीत आचार्य श्री भगवंताच्या या नित्य तारुण्याचा विचार मांडत आहेत.

वक्त्रेन्दोरन्दराले कृतवसतिरिवाभाति नक्षत्रराजिः - भगवंताच्या मुख रुपी चंद्राच्या सोबत नक्षत्र रुपी तारकां प्रमाणे लखलखत असणारी,

लक्ष्मीकान्तस्य - भगवान श्री विष्णूंची, कान्ताकृतिरतिविलसन्मुग्धमुक्ताफलश्रीः - देवी लक्ष्मीची रती म्हणजे प्रेम रुपी चुंबन कृतीने ज्यांचे तेज अधिकच प्रदीप झाले आहे अशी, मोत्याप्रमाणे चमकणारी,

दन्ताली संततं सा नतिनुतिनिरतान् रक्षतादक्षता नः - ती दंतपंक्ती भगवंताच्या चरणी नमस्कार करणाऱ्या आम्हा सगळ्यांच्या रक्षणामध्ये दक्ष असो. आमच्या सर्व दुःखांना नष्ट करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**३६६) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - ३७**

ब्रह्मन्ब्रह्मण्यजिह्मां मतिमपि कुरुषे देव संभावये त्वां
शंभो शक्र त्रिलोकीमवसि किममरैः नारदाद्याः सुखं वः ।
इत्थं सेवावनम्रं सुरमुनिनिकरं वीक्ष्य विष्णोः प्रसन्न-
स्यास्येन्दोरास्रवन्ती वरवचनसुधा ह्लादयेन्मानसं नः ।।३७।।

भगवंताच्या नितांत रमणीय अशा प्रकारच्या दंतपंक्तीचे वैभव वर्णन केल्यानंतर त्या मुखकमलातून प्रकटणाऱ्या दिव्य वाणी चा विचार आचार्य श्री या श्लोकात करीत आहेत.

आपल्या समोर उपस्थित असणाऱ्या विविध देवतांना तथा ऋषीमुनींना भगवान ज्या शब्दात क्षेमकुशल विचारतात त्या शब्दावलीचे वर्णन आचार्यांनी येथे केले आहे. ते म्हणतात,

ब्रह्मन्ब्रह्मण्यजिह्मां मतिमपि कुरुषे देव संभावये त्वां - हे ब्रह्मदेवा ! ब्रह्म विषयक चिंतन केल्याने आपली बुद्धी ब्रह्मज्ञानाला प्राप्त होत आहे ना ?

शंभो शक्र त्रिलोकीमवसि - हे भगवान शंकरा ! आपण या संपूर्ण त्रैलोक्याचा सांभाळ व्यवस्थित करीत आहात ना ?

किममरैः नारदाद्याः सुखं वः - हे देव-देवतांनो तथा देवर्षी नारद ऋषी मुनींनो आपण सुखात आहात ना ?

भगवान ब्रह्मदेवांना ब्रह्मविद्या, भगवान शंकरांना विश्व संचालक शक्ती, देवता आणि ऋषींना सुख अशा गोष्टींची विचारणा केली आहे ? एखाद्या गोष्टीची विचारणा करावी त्याच्यामुळे ती गोष्ट प्राप्त होते. या न्यायाने वरील सर्व गोष्टी त्या सगळ्यांना भगवान विष्णूंचा कृपेने प्राप्त होतात असे आचार्य श्री सुचवत आहेत.

इत्थं सेवावनम्रं सुरमुनिनिकरं वीक्ष्य विष्णोः प्रसन्न - अशा पद्धतीनेऋषीमुनींच्या समुदायाला पाहून प्रसन्नपणे प्रगटणारी,

स्यास्येन्दोरास्रवन्ती वरवचनसुधा ह्लादयेन्मानसं नः - अशी चंद्राच्या प्रकाशाप्रमाणे आल्हाददायक असणारी, भगवान श्रीविष्णूची वचनरूपी अमृतधारा आम्हा सगळ्यांच्या मनाला आल्हादित करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

### ३६७) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र -३८

कर्णस्थस्वर्णकम्रोज्ज्वलमकरमहाकुण्डलप्रोतदीप्य-
न्माणिक्यश्रीप्रतानैः परिमिलितमलिश्यामलं कोमलं यत् ।
प्रोद्यत्सूर्यांशुराजन्मरकतमुकुराकारचोरं मुरारेः
गाढामागामिनीं नो गमयतु विपदं गण्डयोर्मण्डलं तत् ।।३८।।

प्रस्तुत श्लोकात आचार्य श्री भगवान श्री विष्णूंचा कपोल प्रदेशाचे अर्थात गालाच्यावर असणाऱ्या उंचवट्याचे वर्णन करीत आहेत.

त्यांच्या अद्वितीय तेजस्वीतेचा विचार करताना आचार्य श्री म्हणतात,

कर्णस्थस्वर्णकम्रोज्ज्वलमकरमहाकुण्डलप्रोतदीप्य- भगवान श्रीविष्णूंनी आपल्या कानात धारण केलेल्या अत्यंत सुंदर आणि तेजस्वी असणाऱ्या सुवर्णमय मकर कुंडल मधून बाहेर पडणाऱ्या रत्नांच्या प्रभेने भगवंताचे कपोलप्रदेश उजळून निघालेले आहेत.

न्माणिक्यश्रीप्रतानैः परिमिलितमलिश्यामलं कोमलं यत् - अली म्हणजे भुंगा. त्याच्याप्रमाणे निळसर काळे असणारे ते अत्यंत कोमल कपोल प्रदेश कुंडलातील माणिकांच्या प्रभेने तथा भगवंताच्या अत्यंत निरोगी प्रकृतीमुळे असणाऱ्या लालिमेने अधीकच आकर्षक दिसत आहेत.

प्रोद्यत्सूर्यांशुराजन्मरकतमुकुराकारचोरं मुरारेः - प्रात:काळच्या लालबुंद अरुण प्रकाशाने उजळून निघालेल्या एखाद्या पाचू किंवा नीलम प्रमाणे गडद रंगाचे

पाचू किंवा नीलम रत्न अत्यंत गडद रंगाचे असते. त्यावर समजा सकाळचा अरुणोदय काळचा लालबुंद प्रकाश पसरला तर ते जसे दिसेल तसे भगवंताचे गाल दिसत आहेत ही कल्पना किती नयनमनोहर आहे?

भगवान श्री विष्णूंचे,

गाढामागामिनीं नो गमयतु विपदं गण्डयोर्मण्डलं तत् - मजबूत प्रकृती असणाऱ्यांचे शरीर अवयव अत्यंत घट्ट असतात. तशा स्वरूपाचे असणारे भगवंताचे ते कपोल प्रदेश आमच्या सर्व विपत्तींचे निराकरण करणारे ठरोत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३६८) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - ३९

वक्त्रांभोजे लसन्तं मुहुरधरमणिं पक्वबिम्बाभिरामं
दृष्ट्वा दष्टुं शुकस्य स्फुटमवतरतः तुण्डदण्डायते यः ।
घ्रणः शणीकृतात्मा श्रवणयुगलसत्कुण्डलोस्रैर्मुरारेः
प्राणाख्यस्यानिलस्य प्रसरणसरणिः प्राणदानाय नः स्यात् ।।३९।।

भगवंताच्या अत्यंत सुकुमार आणि उन्नत अशा कपोल प्रदेशांचे वर्णन केल्यानंतर, आचार्य श्रींची दृष्टी त्या दोन कपोलांच्या मध्ये असणाऱ्या, अत्यंत नयनमनोहर अशा नासिकेवर खिळते. तिच्या सौंदर्याचे वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

वक्त्रांभोजे लसन्तं - मुखरूपी कमलावर विलसत असणारी,

मुहुरधरमणिं पक्वबिम्बाभिरामं
दृष्ट्वा दष्टुं शुकस्य स्फुटमवतरतः तुण्डदण्डायते यः - परिपक्व अशा गुंजे प्रमाणे शोभून दिसणाऱ्या अधरोष्ठावर असल्यामुळे पोपटाचा सुंदर चोची प्रमाणे आकर्षक दिसणारी,

भगवंताचे नाक अत्यंत बाकदार आहे. ती नासिका खाली असणाऱ्या लाल चुटुक अशा ओठा वर वाकलेली असल्याने जणू काही पोपटाच्या लालबुंद चोची प्रमाणे शोभून दिसत आहे ही आचार्यांची कल्पना खरोखरच रोमांचकारक आहे.

घ्रणः शणीकृतात्मा श्रवणयुगलसत्कुण्डलोस्रैर्मुरारेः -

भगवान श्रीहरींच्या कानामध्ये धारण केलेल्या रत्नांच्या प्रकाशाने ती अधिकच उजळून दिसत आहे.

प्राणाख्यस्यानिलस्य प्रसरणसरणिः प्राणदानाय नः स्यात् - प्राण नामक वायूच्या सर्वत्र पसरण्याचे मूळ स्रोत असणारी, अर्थात तेथूनच संपूर्ण जगाला श्वासोच्छवास ऊर्जा प्राप्त होत असते अशी, भगवंताची ती दिव्य नासिका आमच्या प्राणांचे रक्षण करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**३६९) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र -४०**

दिक्कालौ वेदयन्तौ जगति मुहुरिमौ संचरन्तौ रवीन्दू
त्रैलोक्यालोकदीपावभिदधति ययोरेव रूपं मुनीन्द्राः ।
अस्मानब्जप्रभे ते प्रचुरतरकृपानिर्भरं प्रेक्षमाणे
पातामाताम्रशुक्लासितरुचिरुचिरे पद्मनेत्रस्य नेत्रे ।।४०।।

प्रस्तुत श्लोकात आचार्य श्री भगवान श्रीहरीच्या अद्वितीय नेत्रकमलांचे वर्णन करीत आहेत.ते म्हणतात,

दिक्कालौ वेदयन्तौ जगति मुहुरिमौ संचरन्तौ रवीन्दू - वारंवार आकाश मंडलामध्ये उदय तथा अस्त रूपात फिरत असणारे, जगाला दिशा आणि काळाचे मार्गदर्शन करणारे , सूर्य आणि चंद्र,

त्रैलोक्यालोकदीपावभिदधति ययोरेव रूपं मुनीन्द्राः - जगताला प्रकाश दाखवत असल्यामुळे अशा स्वरूपात प्रकाशित असणाऱ्या त्या भगवंताच्या नेत्रा प्रमाणे आहेत.

अस्मानब्जप्रभे ते प्रचुरतरकृपानिर्भरं प्रेक्षमाणे - कमळाप्रमाणे अत्यंत प्रभा युक्त अर्थात तेजस्वी आणि आनंद देणारे असे ते अपार कृपेने भरलेल्या दृष्टीने आम्हाला पाहणारे,

पातामाताम्रशुक्लासितरुचिरुचिरे पद्मनेत्रस्य नेत्रे - लाल, पांढरे, काळ्या रंगाने अत्यंत आकर्षक दिसणारे नेत्र कमल आमचे रक्षण करोत.

भगवंताच्या नेत्रा मध्ये असणाऱ्या तीन रंगांचा विचार येथे आचार्यांनी केला आहे. त्यामध्ये भगवंताच्या नेत्रातील बाकीची बाजू पांढरीशुभ्र आहे. मध्यभागी असणारी बुबुळे काळी कुळकुळीत आहेत या दोन गोष्टी तर सहज लक्षात येतात. लाल रंगाचा संबंध काय? तर जी व्यक्ती अत्यंत आरोग्यसंपन्न असते तिच्या डोळ्यांच्या कडा लाल रंगाच्या असतात. भगवंताच्या त्या कडांचा लाल रंग येथे आचार्यांना अपेक्षित आहे.

अशा तीन रंगांनी जणू काही त्रिगुण स्वरूपात सर्वत्र पाहणारे भगवंताचे ते नेत्र आमचे कल्याण करोत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली


विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११


### ३७०) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र ४१

लक्ष्माकारालकालिस्फुरदलिकशशांकार्धसंदर्शमील-
न्नेत्रांभोजप्रबोधोत्सुकनिभृततरालीनभृंगच्छदाभे ।
लक्ष्मीकान्तस्य लक्ष्यीकृतविबुधजनापांगबाणासनार्ध-
च्छाये नो भूतिभूरिप्रसवकुशलते भ्रूलते पालयेताम् ।।४१।।

या आणि यापुढच्या श्लोकांमध्ये भगवान जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज भगवान श्रीहरीच्या भुवयांचे वर्णन करीत आहेत. त्या अत्यंत नयनमनोहर असणाऱ्या आणि हृदय आल्हादक अशा पद्धतीच्या हालचाल करणाऱ्या भुवयांचे वैभव सांगताना आचार्य श्री म्हणतात,

लक्ष्माकारालकालिस्फुरदलिकशशांकार्धसंदर्शमील- चंद्राच्या परिपूर्ण बिंबावर असणाऱ्या डागाप्रमाणे शोभून दिसणारी कुरळ्या केसांची एक बट भगवंताच्या चंद्र रुपी मस्तकावर रुळत आहे.

येथे आचार्यश्री एक अत्यंत अभिनव कल्पना आपल्यासमोर ठेवत आहेत. भगवंताच्या मस्तकाला त्यांनी अत्यंत अल्हाददायक असणाऱ्या चंद्राची उपमा दिली आहे. त्यावर येणारी बट जणू त्यावरील डाग आहे. त्यापेक्षा पुढे वर्णन करताना ते म्हणतात या चंद्राला पाहिल्यानंतर भगवंताचे सूर्य विकासी कमळाप्रमाणे असणारे नेत्र जळून काही चंद्र उगवला असे मानून अर्धवट मिटतात. त्या अर्धवट मिटलेल्या डोळ्यांच्या वर असणाऱ्या या भुवया म्हणजे,

न्नेत्रांभोजप्रबोधोत्सुकनिभृततरालीनभृंगच्छदाभे - नेत्र रुपी कमळांच्या उगवण्याची वाट पहात त्याच्यावर गुंजारव करत घिरट्या घालणाऱ्या भ्रमरांची रांग आहे.

लक्ष्मीकान्तस्य लक्ष्यीकृतविबुधजनापांगबाणासनार्ध- भगवान लक्ष्मीकांत श्री विष्णूंच्या या बाणासन अर्थात धनुष्याप्रमाणे असणाऱ्या,

च्छाये नो भूतिभूरिप्रसवकुशलते भ्रूलते पालयेताम् - विपुल मंगला ची निर्मिती करणाऱ्या, कौशल्यपूर्ण भ्रूलता आम्हाला सावली देख आमचे पालन करोत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**३७१) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र -४२**

पातात्पातालपातात्पतगपतिगतेर्भ्रूयुगं भुग्नमध्यं
येनेषच्चालितेन स्वपदनियमिताः सासुराः देवसंघाः ।
नृत्यल्लालाटरंगे रजनिकरतनोरर्धखण्डावदाते
कालव्यालद्वयं वा विलसति समया बालिकामातरं नः ।।४२।।

भगवान श्रीविष्णूंच्या भुवयांचे वर्णन करताना आचार्य श्री पुढे म्हणतात,

पातात्पातालपातात्पतगपतिगते भ्रूयुगं भुग्नमध्यं - पतगपती अर्थात पक्षांचा राजा असणाऱ्या गरुडाच्या भीतीने पाताळात जाऊन लपलेल्या महासर्पां प्रमाणे असणाऱ्या, दोन्ही भूभागाच्या मध्यभागी विद्यमान असणाऱ्या,

भगवंताच्या भुवया काळ्याशार असल्याने त्यांना सर्पाची उपमा दिली आहे. कपाळावरून या भुवया कानाच्या दिशेने जात आहेत. कान म्हणजे जणूकाही पाताल विवर आणि त्या कडे जाणाऱ्या भुवया जणूकाही महा सर्प ही आचार्य श्रींची अद्वितीय प्रतिभा शैली आहे.

येनेषच्चालितेन स्वपदनियमिताः सासुराः देवसंघाः - ज्यांच्या संचालनाने भगवान श्रीविष्णु राक्षसांच्या आणि देवांच्या समूहाचे संचालन करतात.

अर्थात त्यांनी केवळ भुवई हलवली तरी या दोघांनाही आपापली कामे मुकाट्याने करावी लागतात. भगवान यांचे संचालन करतात ते या अर्थाने.

नृत्यल्लालाटरंगे - ललाट रुपी रंगमंचावर नृत्य करणाऱ्या एखाद्या अद्वितिय नर्तिके प्रमाणे असणाऱ्या, रजनिकरतनोरर्धखण्डावदाते - भगवान चंद्राच्या कोरीप्रमाणे अत्यंत रेखीव असणाऱ्या,

कालव्यालद्वयं वा विलसति समया बालिकामातरं नः - दोन अत्यंत विशाल सर्पां प्रमाणे विलास करीत असणाऱ्या या बालिके प्रमाणे अल्लड आणि त्याच वेळी मातेप्रमाणे आदरणीय असणाऱ्या दोन भुवया आमचे संरक्षण करोत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३७२) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - ४३

रूक्षस्फारेक्षुचापच्युतशरनिकरक्षीणलक्ष्ये कटाक्ष-
प्रोत्फुल्लत्पद्ममाला विलसित महित स्फाटिकैशान लिङ्गम् ।
भूयाद्भूयो विभूत्यै मम भुवनपतेः भ्रूलताद्वन्द्वमध्या-
दुत्थं तत्पुण्ड्रमूर्ध्वं जनिमरणतमः खण्डनं मण्डनं च ।।४३।।

भगवान श्रीहरींच्या सुन्दरतम अशा प्रकारच्या भुवयांचे वर्णन केल्यानंतर बाबा विकत आचार्य श्रींची दृष्टी त्या भुवयांच्या वर असणाऱ्या अत्यंत सुंदर अशा तिलकाकडे जाते. त्या ऊर्ध्वपुंड्र अर्थात उभ्या स्वरूपात लावलेल्या टिळ्याचे आचार्य श्री प्रस्तुत श्लोकात वर्णन करीत आहेत. ते म्हणतात,

रूक्षस्फारेक्षुचापच्युतशरनिकरक्षीणलक्ष्ये कटाक्ष-

अत्यंत निर्दयपणे समोरच्याला संपवणाऱ्या मदनाच्या उसाच्या धनुष्याद्वारे देवी लक्ष्मी ने सोडलेले नेत्र कटाक्ष जेथे येऊन शांत होतात.

ही आचार्य श्रींची कल्पना अत्यंत रमणीय आहे. तो टिळा चंदनाचा आहे. त्यामुळे अत्यंत शीतल आहे. जगातील सगळ्यात मोठा ताप म्हणजे मदनाची पीडा. त्यातही देवी लक्ष्मी समान अनुपमेय सौंदर्यवती च्या माध्यमातून आलेली ही पीडा देखील शांत करणारा तो चंदन तिलक आहे.

प्रोत्फुल्लत्पद्ममाला विलसित महित स्फाटिकैशान लिङ्गम् ।

कमळाची माला धारण केलेल्या भगवान शंकरांच्या स्फटिक लिंगा प्रमाणे असणारा.

यामध्ये त्याच्या आकाराचा विचार आहे. त्याच प्रमाणे त्या चंदनाच्या टिळ्यावर लावलेला कुंकुमतिलक म्हणजे जणू काही पांढऱ्या शुभ्र भगवान शंकरावर वाहिलेले रक्त कमल असावे तसेच सौंदर्य दिसत आहे असे आचार्य म्हणतात.

भूयाद्भूयो विभूत्यै मम भुवनपतेः भ्रूलताद्वन्द्वमध्या- भगवान श्री विष्णू च्या दोन भुवयां रूपी लतांच्या मध्यभागी विलसत असणारा तो तिलक आमच्या विविध कल्याणाचे कारण ठरो.

दुत्थं तत्पुण्ड्रमूर्ध्वं जनिमरणतमः खण्डनं मण्डनं च - वरच्या दिशेला उठलेला तो पुंड्र म्हणजे तिलक आमच्या जन्ममरणाचे खंडन करणारा ठरो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

### ३७३) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र -४४

पीठीभूतालकान्ते कृतमुकुटमहादेवलिङ्गप्रतिष्ठे
लालाटे नाट्यरंगे विकटतरतट कैटभारेश्चिराय ।
प्रोद्घाट्यैवात्मतन्द्रीप्रकटपटकुटीं प्रस्फुरन्तीं स्फुटांगम्
पट्वीयं भावनाख्यां चटुलमतिनटी नाटिकां नाटयेत्रः ।।४४।।

भगवान श्रीहरीच्या दिव्य तिलका चे वर्णन केल्यानंतर तो तिलक ज्या भालप्रदेशावर विलसत आहे त्या कपाळाचे वर्णन आचार्य श्री प्रस्तुत श्लोकात सादर करीत आहेत.

त्या कपाळासोबत त्याच्यावर असणाऱ्या मुकुटाचा आरंभ तिथूनच होत असल्याने या मुकुटाचे लोकविलक्षण वर्णन आचार्य यांनी येथे केले आहे.

ते म्हणतात,

पीठीभूतालकान्ते कृतमुकुटमहादेवलिङ्गप्रतिष्ठे - भगवान श्रीविष्णूच्या कुरळ्या अशा केसावर अधिष्ठित असणारा मस्तकावरील मुकुट भगवान श्री महादेवांच्या लिंगाप्रमाणे दिसत आहे.

येथे आचार्यांनी प्रतिपादित केलेली हरिहर ऐक्य अत्यंत विलोभनीय आहे.

आपल्याला प्राधान्याने आठवल्याशिवाय राहत नाही.

भगवान श्री विष्णूंच्या मस्तकावर शिवलिंग असणे ही कल्पनाच दोघांच्या ऐक्याला विशेषत्वाने प्रगट करणारी आहे.

लालाटे नाट्यरंगे विकटतरतट कैटभारेश्चिराय - अशा त्या कैटभ राक्षसाला मारणाऱ्या भगवान श्री हरीचा अत्यंत सुंदर अशा पद्धतीचा ललाट प्रदेश जणूकाही एखाद्या रंगमंचाप्रमाणे आकर्षक दिसत आहे.

प्रोद्घाट्यैवात्मतन्द्रीप्रकटपटकुटीं प्रस्फुरन्तीं स्फुटांगम्

पट्वीयं भावनाख्यां चटुलमतिनटी नाटिकां नाटयेत्रः - त्या रंगमंचावर विविध प्रकारच्या कलागुणांना सादर करण्यात अत्यंत पटू असणारी आमची बुद्धी एखाद्या कुशल नटीप्रमाणे नृत्याचे विविध अंग सादर करीत मोक्षाचे नृत्य करो.

अर्थात जशी एखादी नर्तकी कायम रंगमंचावरच विलास करते त्याप्रमाणे आमची बुद्धी कायम भगवंताच्या या भालप्रदेशावरच खिळलेली राहो. तेथेच तिला आनंद प्राप्त होवो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

### ३७४) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र -४५

मालालीवालिधाम्नः कुवलयकलिता श्रीपतेः कुन्तलाली
कालिन्द्यारुह्य मूर्ध्नो गलति हरशिरः स्वर्धुनी स्पर्धया नु ।
राहुर्वा याति वक्त्रं सकलशशिकलाभ्रान्ति लोलान्तरात्मा
लोकैरालोच्यते या प्रदिशतु सकलैः साखिलंमंगलं नः ।।४५।।

या आणि या पुढच्या श्लोकात आचार्य श्री भगवान श्रीविष्णूच्या अद्वितीय अशा केशसंभाराचे वर्णन करीत आहेत.

त्यासाठी त्यांनी योजलेल्या उपमा एखाद्या महाकवींच्या प्रतिभेला लाजवतील अशा पद्धतीच्या अद्वितीय आहेत.

आचार्य श्री म्हणतात,

मालालीवालिधाम्नः कुवलयकलिता श्रीपतेः कुन्तलाली - मेघाप्रमाणे कृष्ण वर्णन असणाऱ्या भगवान श्रीविष्णूंच्या या कुरळ्या केसांच्या बटा निळ्या कमळाप्रमाणे आकर्षक दिसत आहेत.

कालिन्द्यारुह्य मूर्ध्नो गलति हरशिरः स्वर्धुनी स्पर्धया नु - भगवान शंकरांच्या मस्तकावर असणाऱ्या गंगेशी जणू काही स्पर्धा करीत भगवान विष्णूच्या डोक्यावरून वाहणाऱ्या कालिंदी प्रमाणे हे केस दिसत आहेत.

आचार्यांची ही कल्पना अत्यंत लोकविलक्षण आहे. भगवान शंकरांनी स्वर्धुनी म्हणजे गंगेला आपल्या डोक्यावर धारण केले. त्यामुळे जणू काही कालिंदी म्हणजे यमुना नाराज झाली. ती जणू काही भगवान विष्णूंच्या मस्तकावर आरूढ झाली. तिच्या काळ्या पाण्याचा प्रवाह खाली यावा तसे ते केस दिसत आहेतकल्पना केवळ आणि केवळ आचार्यांनाच सुचू शकते.

राहुर्वा याति वक्त्रं सकलशशिकलाभ्रान्ति - किंवा भगवंतांच्या मुखरुपी चंद्राला ग्रहण लावण्यासाठी आलेल्या राहू प्रमाणे ती दिसते.

ही आणखीन एक अद्भुत उपमा.

भगवंताचे मुख जणू चंद्र आहे. फिरणार्या त्या केसांना आचार्य राहू रूपात पाहतात. लोलान्तरात्मा

लोकैरालोच्यते या प्रदिशतु सकलैः साखिलंमंगलं नः - सर्व जगाचे प्राण आनंदित करणारी अशी ती केशवाची केशमालिका आम्हाला अखिल मंगल प्रदान करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

### ३७५) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - ४६

सुप्ताकाराः सुषुप्ते भगवति विबुधैरप्यदृष्टस्वरूपा
व्याप्तव्योमान्तरालास्तरलरुचिजलारंजिताः स्पष्टभासः ।
देहच्छायोद्गमाभा रिपुवपुरगुरुप्लोषरोषाग्निधूम्याः
केशाः केशिद्विषो नो विदधतु विपुलक्लेशपाशप्रणाशम् ।।४६।।

भगवान श्रीविष्णूच्या वैशिष्ट्यपूर्ण केशसंभाराचे वर्णन करताना आचार्य श्री म्हणतात,

सुप्ताकाराः सुषुप्ते भगवति विबुधैरप्यदृष्टस्वरूपा - ज्याप्रमाणे सुषुप्ति मध्ये मग्न असलेला जीवात्मा बाहेरून जाणवत नाही, मायेने आवृत्त झालेले ब्रह्म इतरांना जाणवत नाही त्याप्रमाणे भगवान झोपले असताना या केशसंभारामुळे ते देवतांना देखील दिसेनासे होतात. यामध्ये भगवान जणूकाही झाकाळले जातात.

व्याप्तव्योमान्तरालास्तरलरुचिजलारंजिताः स्पष्टभासः - त्या केसांवर धारण केलेल्या मुकुटा मध्ये लावलेल्या मण्यांची चमक पाहतांना जणूकाही विशाल आकाशात होत असलेली चांदण्यांची चमचम जाणवते. संपूर्ण काळ्या आकाशाच्या पार्श्वभूमीवर लुकलुकणाऱ्या चांदण्यांच्याप्रमाणे जाणवणारी आचार्यांची प्रतिभा खरोखरच अद्वितीय आहे.

देहच्छायोद्गमाभा रिपुवपुरगुरुप्लोषरोषाग्निधूम्याः - संपूर्ण शत्रूच्या शरीररूपी ऊद-राळ यांना जाळून उठणाऱ्या धुराच्या रेषेप्रमाणे हे कुरळे केस भासतात.

आचार्य श्रींच्या अलौकिक प्रतिभेतून साकारलेली आणखीही एक वेगळी उपमा. भगवंताची केस कुरळे आहेत. त्या कुरळ्या रेषा त्यांना धुरा प्रमाणे वाटतात. मात्र धूप लावल्यानंतर येणारा धूर पांढरा असतो. मात्र केस काळे आहेत. त्यासाठी आचार्य श्री हा धूप सामान्य नसून राक्षसांच्या विनाशातून उगवलेला आहे असे म्हणतात त्यात राक्षसांचा काळेपणा आहे अशी अद्वितीय भूमिका मांडत आहेत.

केशाः केशिद्विषो नो विदधतु विपुलक्लेशपाशप्रणाशम् - केशी राक्षसाला मारणाऱ्या भगवंताच्या केसां मुळे आमचे सर्व क्लेश रुपी पाश नष्ट होवोत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३७६) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र -४७

यत्र प्रत्युप्तरत्नप्रवरपरिलसद्भूरिरोचिष्प्रतान-
स्फूर्त्या मूर्तिमुरारेर्द्युमणिशतचितव्योमवद्दुर्निरीक्ष्या ।
कुर्वत्पारेपयोधि ज्वलदकृतमहाभास्वदौर्वाग्निशंकां
शश्वन्नः शर्म दिश्यात्कलिकलुषतमःपाटनं तत्किरीटम् ।।४७।।

भगवान श्रीहरीच्या मस्तकावरील अद्वितीय अशा केसांचा विचार केल्यानंतर आचार्यश्री त्या केसांवर विराजित असणाऱ्या अतुलनीय सौंदर्यपूर्ण मुकुटाचे वर्णन करीत आहेत. त्यासाठी त्यांनी योजिलेल्या उपमा देखील अतुलनीय अशाच आहेत.

आचार्य श्री म्हणतात,

यत्र प्रत्युप्तरत्नप्रवरपरिलसद्भूरिरोचिष्प्रतान- भगवंताच्या त्या मुकुटावर लावलेल्या अत्यंत तेजस्वी रत्नांची प्रभा सर्वत्र फाकलेली आहे.

स्फूर्त्या मूर्तिमुरारेर्द्युमणिशतचितव्योमवद्दुर्निरीक्ष्या - मुळात भगवंताचे अत्यंत तेजस्वी असे मुखकमल, त्या भगवान मुरारीच्या मस्तकावर असणाऱ्या शेकडो मण्यांना त्यामुळे प्राप्त होत असलेली तेज पाहता एकाच वेळी आकाशामध्ये शेकडो सूर्य चमकले तर जसे ते दृश्य पाहणे असंभव ठरते तसे हे दृश्य वाटत आहे.

कुर्वत्पारेपयोधि ज्वलदकृतमहाभास्वदौर्वाग्निशंकां - भगवंताच्या काळ्याशार केसांच्या लहरींवर चमकणारा तो सुवर्ण मंडित मुकुट जणूकाही  विशाल समुद्राच्या पलीकडे ज्वाला उसळणाऱ्या वडवाग्नी प्रमाणे दिसत आहे.

समुद्राच्या पलीकडे म्हणतांना जसा त्या केसांच्या लाटांचा विचार आहे तसाच त्याची तेजस्विता तर अग्नीप्रमाणे आहे पण पलीकडच्या किनार्यावर असल्याने दाह नाही. अशी मजेदार रचना आहे

शश्वन्नः शर्म दिश्यात्कलिकलुषतमःपाटनं तत्किरीटम् - असा तो भगवंताचा किरीट आमच्या सर्व अमंगलाचे निवारण करून तुम्हाला शाश्वत मांगल्य प्रदान करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३७७) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र -४८

भ्रान्त्वा भ्रान्त्वा यदन्तस्त्रिभुवनगुरुरप्यब्दकोटीरनेका:
गन्तुं नान्तं समर्थो भ्रमर इव पुनर्नाभिनालीकनालात् ।
उन्मज्जन्नूर्जितश्रीस्त्रिभुवनमपरं निर्ममे तत्सदृक्षं
देहांभोधिः स देयान्निरवधिरमृतं दैत्यविद्वेषि विष्णोः ।।४८।।

भगवान श्रीविष्णूच्या अपार देह वैभवाचे वर्णन तेथे आचार्य श्री आपल्या विशिष्ट शैलीत सादर करीत आहेत.

त्यासाठी त्यांनी एक कल्पना आधारभूत मानलेली आहे. ती कल्पना म्हणजे एकदा भगवान विष्णू चा नाभीतून उत्पन्न कमला वर बसलेल्या भगवान ब्रह्मदेवांना श्रीहरीच्या स्वरूपाचे सर्वांगपरिपूर्ण दर्शन घेण्याची इच्छा झाली. त्यासाठी त्या कमळाच देठातून ते भगवंताच्या आत शिरले. मात्र त्यांना आलेल्या अपयशाच्या वर्णनातून आचार्य श्री भगवंताच्या अपार यशाचे वर्णन करीत आहेत.

ते म्हणतात,

भ्रान्त्वा भ्रान्त्वा यदन्तस्त्रिभुवनगुरुरप्यब्दकोटीरनेका: - या त्रिभुवनाचे पालक असणार्या भगवंताच्या मर्यादेचा विचार करीत हजारो कोटी वर्ष फिरल्यानंतर सुद्धा,

गन्तुं नान्तं समर्थो भ्रमर इव पुनर्नाभिनालीकनालात् - त्याचा पार लावण्यास असमर्थ ठरलेले ब्रह्मदेव एखाद्या भुंग्या प्रमाणे आपले निवासस्थान असणाऱ्या त्याच आपल्या कमळात येऊन शांत बसले.

उन्मज्जन्नूर्जितश्रीस्त्रिभुवनमपरं निर्ममे तत्सदृक्षं - त्यानंतर त्यांनी केलेल्या तपश्चर्येमुळे त्यांना झालेल्या कृपेने त्यांनी आत पहिलेल्या संसारा प्रमाणे या ब्रम्हांडाची रचना केली.

देहांभोधिः स देयान्निरवधिरमृतं दैत्यविद्वेषि विष्णोः - त्या दैत्य शत्रू असणाऱ्या भगवान विष्णूंचे ते अपार सागराप्रमाणे असणारे सगुणरूप आम्हाला निरंतर अमृत प्रदान करो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**३७८) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र -४९**

मत्स्यः कूर्मो वराहो नरहरिणपतिः वामनो जामदग्न्यः
काकुत्स्थः कंसघाती मनसिजविजयी यश्च कल्की भविष्यन् ।
विष्णोरंशावतारा भुवनहितकरा धर्मसंस्थापनार्थाः
पायासुर्मां त एते गुरुतरकरुणाभारखिन्नाशया ये ।।४९।।

प्रस्तुत श्लोकांमध्ये आचार्य श्री भगवान श्रीहरी विश्व उद्धारासाठी धारण केलेल्या दशावतारांचे वर्णन करीत आहेत.

ते म्हणतात,

मत्स्यः - महाराज मनूंचे संरक्षण करून प्रलय काळात त्यांना वाचवणाऱ्या, त्यांच्याद्वारे नव सृष्टी ची निर्मिती करणाऱ्या मत्स्य स्वरूपात नटलेल्या,

कूर्मो - समुद्रमंथनाच्या वेळी मंदराचल बुडू लागल्यानंतर त्याला आधार देण्यासाठी कूर्म रूपाच साकारलेल्या,

वराहो - हिरण्याक्षाने पृथ्वी बुडवल्यानंतर तिला वाचवण्यासाठी वराह अर्थात ज्ञान रूपात प्रकटलेल्या,

नरहरिणपतिः - भक्तराज प्रल्हादाला सुख देण्यासाठी, हिरण्यकश्यपू चा वध करण्यासाठी नरसिंह रूपात प्रकटलेल्या,

वामनो - महाराज बलींच्या उद्धारासाठी वामन रूप धारण केलेल्या,

जामदग्न्यः - उन्मत्त राजसत्ता रुपी सहस्त्रार्जुनाचा वध करीत धर्म सत्तेची स्थापना करणाऱ्या जमदग्नी पुत्र परशुराम रूपात लीला करणाऱ्या,

काकुत्स्थः - ककुत्स्थ राजाच्या वंशात श्री रामचंद्र रुपात प्रगटल्यामुळे काकुत्स्थ हे नाव धारण करणाऱ्या,

कंसघाती - कंसादिकांच्या विनाशासाठी भगवान श्रीकृष्ण रूपात अवतीर्ण झालेल्या,

मनसिजविजयी - मनसिज अर्थात काम इ. सर्व विकारांना जिंकणाऱ्या जितेंद्रिय बुद्ध रूपात जगाला शांतीचा मार्ग दाखवणाऱ्या,

यश्च कल्की भविष्यन् - भविष्यामध्ये कल्की रूपाय अवतीर्ण होणार्या

विष्णोरंशावतारा - भगवान विष्णूंचे जे विविध अवतार झाले,

भुवनहितकरा धर्मसंस्थापनार्थाः - ते धर्मसंस्थापना करणारे आणि विश्वाचे परम हित साधणारे, सर्व अवतार,

पायासुर्मां त एते गुरुतरकरुणाभारखिन्नाशया ये - अत्यंत श्रेष्ठ अशा करुणेने, खिन्नतेचे आशय असणाऱ्या माझे संरक्षण करोत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ३७९) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - ५०

यस्माद्वाचो निवृत्ताः सममपि मनसा लक्षणामीक्षमाणाः
स्वार्थालाभात्परार्थ व्यपगमकथनश्लाघिनो वेदवादाः ।
नित्यानन्दं स्वसंविन्निरवधिविमलस्वांतसंक्रान्तबिंब-
च्छायापत्यापि नित्यं सुखयति यमिनो यत्तदव्यान्महो नः ।।५०।।

अशा स्वरूपात भगवान श्रीविष्णूच्या अलौकिक स्वरूपाच्या सगुण-साकार रूपाचे वर्णन केल्यानंतर आचार्य श्री प्रस्तुत श्लोकात त्यांच्या निर्गुण-निराकार स्वरूपास वंदन करीत आहेत. सगुण साकार रूप भक्तांच्या सुविधेसाठी भगवंताने धारण केली असले तरी त्यांचे मूळ स्वरूप निर्गुण निराकार आहे हेच आचार्य येथे अधोरेखित करीत आहेत. ते म्हणतात,

यस्माद्वाचो निवृत्ताः सममपि मनसा लक्षणामीक्षमाणाः - ज्याच्यापाशी गेल्यानंतर वाणी निवृत्त होते. मनासह ती त्या स्वरूपाचे ठिकाणी एकरूप झाली की विलय पावते.

स्वार्थालाभात्परार्थ व्यपगमकथनश्लाघिनो वेदवादाः - ज्याचे कोणत्याही स्वरूपाच्या व्यावहारिक अस्तित्वाच्या रूपात वर्णन करणे शक्य नसल्याने वेदविद्या पारंगत नाइलाजाने त्याचे नेति नेति स्वरूपात वर्णन करतात.

अर्थात असे नाही, असे नाही असे म्हणतात सर्व वर्णनाच्या ते पलीकडे आहे,ते केवळ अनुभवता येते हेच सांगतात.

नित्यानन्दं स्वसंविन्निरवधिविमलस्वांतसंक्रान्तबिंब- अशा त्या नित्य आनंद स्वरूप असणाऱ्या, स्वतःच्याच शक्तीने स्वतःची जाणीव करून देणाऱ्या, अत्यंत शुद्ध असणाऱ्या, देहामध्ये जीव स्वरूपात ज्याचे प्रतिबिंब प्रगट होत असते अशा त्या मूळ चैतन्य बिंब स्वरूप असणाऱ्या, च्छायापत्यापि नित्यं सुखयति यमिनो यत्तदव्यान्महो नः - जीव स्वरूपात प्रतिबिंबित झालेले चैतन्य आमचे संरक्षण करो.

या श्लोकात वर्णन करताना आरंभी आचार्यश्री केनोपनिषदातील यतो वाचो निवर्तन्ते... या मंत्राचा उल्लेख करीत आपल्या कथनाला असणारी श्रुती अधिष्ठानाची भूमिका स्पष्ट करीत आहेत. तर शेवटी जीवो ब्रह्मैव नापरः! हा सिद्धांत विशद करीत आहेत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

### ३८०) श्री विष्णु पादादिकेशांत स्तोत्र - ५१

आपादादा च शीर्षाद्वपुरिदमनघं वैष्णवं स्वचित्ते
धत्ते नित्यं निरस्ताखिलकलिकलुषे संततान्तः प्रमोदः ।
जुह्वज्जिह्वाकृशानौ हरिचरितहविः स्तोत्र मन्त्रानुपाठैः
तत्पादांभोरुहाभ्यां सततमपि नमस्कुर्महे निर्मलाभ्याम् ।।५१।।

भगवान श्रीहरीच्या दिव्यरूपाचे आणि निर्गुण निराकार स्वरूपाचे वर्णन केल्यानंतर आचार्य श्री या श्लोकात भगवंताच्या भक्तांना वंदन करीत आहेत. सोबतच अशा भक्तांची जीवनयात्रा कशी असते त्याचेही अद्वितीय निरूपण करीत आहेत.

आपादादा च शीर्षाद्वपुरिदमनघं वैष्णवं स्वचित्ते
धत्ते नित्यं निरस्ताखिलकलिकलुषे संततान्तः प्रमोदः - भगवान श्री विष्णू च्या अशा प्रकारच्या चरण कमला पासून शीर्षा पर्यंत असणाऱ्या अतिदिव्य स्वरूपाला जे वैष्णव अर्थात विष्णूचे उपासक मनामध्ये धारण करतात त्यांच्या अंतरंगी अखंड आनंद प्रवाहित राहतो त्यांना कोणत्याही प्रकारे कलीचा अर्थात कोणत्याही प्रकारच्या अवगुणांचा दोष स्पर्शही करीत नाही.

जुह्वज्जिह्वाकृशानौ हरिचरितहविः स्तोत्र मन्त्रानुपाठैः

असे हे भक्त आपल्या प्रारब्ध वशात चालत राहणाऱ्या जीवन यात्रेत, वाणी रूपी अग्नीमध्ये, हरी चरित्र रुपी आहूत्यांनी, स्तोत्र आणि मंत्र पाठाच्या गजरात हवन करीत राहतात.

त्यांचे संपूर्ण जीवन हाच यज्ञ असतो. त्यांच्या वाणीतून अखंड हरिनाम संकीर्तन प्रसवत असते. तेच आत भरलेले असते तेच बाहेर येते.

तत्पादांभोरुहाभ्यां सततमपि नमस्कुर्महे निर्मलाभ्याम् - अशा त्या निर्मल भक्तांच्या चरण कमलांवर आम्ही सदैव वंदन करतो.